श्री

# सर्वसंग्रहमासिकपुस्तक·

पैकीं

# सुभाषितसंग्रह.

## भाग २रा.





हें पुस्तक

**रावजी श्रीधर गोंधळेकर**

यांनीं

**वें· शा· सं· अनंताचार्य अष्टपुत्रे**

ह्यांच्या साह्यानें तयार केलेलें

**पुणें**

पेठ शनवार मेहुणपुरा येथें.

आपले जगद्धितेच्छु छापखान्यांत शिलायंत्रावर छा०.

तारीख १० एप्रील सन १८८९

इसवी.

किंमत १ टपाल व बंगी ०)

# सुभाषितसंग्रह भाग २ रा.

## अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.



इतीयं सुभाषितसंग्रहस्य द्वितीयांशस्यानुक्रमणिका समाप्ता.

श्री

# सुभाषित प्रशंसा.

सुभाषित संग्रह हा विषय अति उत्तम असून यांत अनेक प्रकारचे दार्ष्टांनिक स-र्व विषयांवर अनेक छंदांचे श्लोक महाकवींनीं अनुभविक केलेले आहेत ते अनेक ग्रं-थांत आहेत परंतु सर्वलोकांस अनेक ग्रंथाचें अवलोकन नसल्यामुळें ज्या ज्या प्रसं-गीं ज्या ज्या विषयांचा ऊहापोह ( तर्करूपज्ञान ) होतो त्या त्या प्रसंगीं सुभा-षितसंग्रह एकत्र निवडक केलेला नसल्या कारणानें समयोचित भाषण करण्यास फार अडचण पडते ती दूर व्हावी आणि सर्व प्रकारच्या विषयांची माहिती होऊन प्रसं-गवशात् नानाप्रकारच्या दृष्टांत दार्ष्टांतिकांनीं आपणास व इतरजनास आनंदही व्हा-वा व नवीन ग्रंथ लिहिणारे, सभेंत व्याख्यान देणारे, कीर्तन करणारे, पुराण सांगणारे व चार मंडळींत बसून मनोरंजक भाषण करणारे इत्यादि सर्व लोकांस या ग्रंथापासू-न बहुत उपयोग व्हावा अशा हेतूस्तव हा ग्रंथ छापून तयार केला आहे. याच्या उदा-हरणाविषयीं चार श्लोक लिहितों.

सुभाषितेन गीतेन युवतीनां च लीलया ॥ यस्य न
द्रवते चित्तं स वै मुक्तो ऽथवा पशुः ॥ १ ॥

**अर्थः-** सुभाषित, गायन व तरुण स्त्रियांची लीला यांनीं ज्याचें चित्त आकर्ष-ण पावत नाहीं तो मुक्त किंवा पशुतुल्य जाणावा.

पृथिव्यां त्रीणि रत्नानि जलमन्नं सुभाषितं ॥ मू-
ढैः पाषाणखंडेषु रत्नसंज्ञा विधीयते ॥ २ ॥

**अर्थः-** जल, अन्न व सुभाषित हीं तीन रत्नें पृथिवींत मुख्य असून मूर्खजन हि-रे, गार इत्यादि पाषाणांचे तुकड्यांस रत्नें असें म्हणतात.

संसारकटुवृक्षस्य द्वे फले ह्यमृतोपमे ॥ सुभाषि-
तरसास्वादः संगतिः सुजने जने ॥ ३ ॥

**अर्थः-** संसाररूप वृक्ष कटु ( कडू ) असून त्यास अमृतासमान मधुर दोन फळें आहेत तीं अशीं कीं, सुभाषितरसाचें श्रवणादिद्वारा सेवन हें १ व सुजनाची सं-गति हें २ रें.

धर्मो यशो नयो दाक्ष्यं मनोहारि सुभाषितं ॥ इ-
त्यादिगुणरत्नानां संग्रही नावसीदति ॥ ४ ॥

**अर्थः-** तसाच धर्म, यश, नीति, सर्वकार्याविषयीं दक्षता व मनास हरण करणारें सुभाषित इत्यादि गुणरूप रत्नांचा संग्रह कर्ता दुःख पावत नाहीं.

या प्रमाणें सुभाषित संग्रहापासून बहुत प्रकारचे उपयोगांविषयीं अनेक ग्रंथकारांचे लेख आहेत तितके घेतल्यानें विनाकारण विस्तार होईल या करितां सदरीं लिहिल्या वरून सुभाषिताचा उपयोग उत्तम आहे हें सहज लक्षांत यईल. आणि हे श्लोक पदच्छेदस्थलीं किंचित् अंतर टाकून त्यांतील पदांवर अर्थक्रमानुसार अन्वयाचे आंकडे टाकून सार्थ लिहिले आहेत.

रावजी श्रीधर गोंधळेकर.

## भाग २रा.

यथा चित्तं तथा वाचो यथा वाचस्तथा क्रियाः॥ चित्ते वाचि क्रियायांच साधूनामेकरूपता ॥ १॥

अर्थः- जसें चित्त तशी वाणी; जशीं भाषणें तशी क्रिया; तस्मात् चित्त, भाषण व क्रिया ह्या तीन्ही प्रकारांत साधूंची एकरूपता असते.

विवेकः सह संयत्या विनयो विद्यया सह॥ प्रभुत्वं प्रश्रयोपेतं चिन्हमेतन्महात्मनां॥२॥

अर्थः- इंद्रियनिग्रहा सहित विवेक, विद्येसहित विनय व नम्रतायुक्त प्रभुत्व हें महात्म्यांचें लक्षण आहे.

सुभाषितमयद्रव्यसंग्रहं न करोति यः॥ प्रस्तावयज्ञे संप्राप्ते कां प्रदास्यति दक्षिणां॥३॥

अर्थः- जो सुभाषितरूप द्रव्याचा संग्रह करीत नाहीं तो प्रस्ताव यज्ञ (संभाषणयज्ञ) प्राप्त झाला असतां त्यांत काय दक्षिणा देईल?

सुभाषितरसास्वाद जातरोमांचकंचुकाः॥ विनापि कामिनीसंगं कवयः सुखमासते॥४॥

अर्थः- सुभाषित संबंधि रसाच्या आस्वादनानें ज्यांच्या अंगावर आनंद रोमांचांचें कवच प्राप्त होतें असे ते ज्ञानी स्त्री संगावांचूनही सुखी असतात.

प्रस्तावे हेतुसुक्तानि यः पठत्यविशंकितः॥ स कविस्तानि काव्यानि काव्ये तस्य परिश्रमः॥ ५॥

अर्थः- जो संभाषण प्रसंगीं निःशंक मनानें हेतुयुक्त वाक्यें पठन करतो तोच कवि, तींच काव्यें व त्याचाच काव्यांत परिश्रम आहे असें जाणावें.

यस्य वक्त्रकुहरे सुभाषितं नास्ति नाप्यवसरे प्रजल्पति॥ आगतः सदसि धीमतामसौ लेप्यनिर्मित इवावभासते॥ ६॥

अर्थः- ज्याच्या मुखगुहेंत सुभाषित नाहीं व जो समयोचित भाषण ही करीत नाहीं तो बुद्धिमंतांच्या सभेंत आला असतां केवळ चित्रासारखा भासतो.

बोद्धारो मत्सरग्रस्ताः प्रभवः स्मयदूषिताः॥ अ-
बोधोपहताश्चान्ये जीर्णमंगे सुभाषितं॥ ७॥

अर्थः- ज्ञानसंपन्न मत्सरानें ग्रस्त असून राजे गर्वानें दूषित झाले आहेत व अन्यलोक अज्ञानानें कुंठितमति आहेत यामुळें सुभाषित अंगांत जीर्ण होऊन गेलें.

प्रसन्नाः कांतिहारिण्यो नानाश्लेषविचक्षणाः॥
भवंति कस्यचित् पुण्यैर्मुखे वाचो गृहे स्त्रियः ८

अर्थः- उत्तानार्थ, भाषणगुणानें मनास हरण करणाऱ्या व अनेक श्लेषांविषयीं कुशल अशा वाणी एकाद्याच्या मुखांत पुण्यानींच प्राप्त होतात आणि प्रसन्नमुख, शोभेनें मनास आकर्षण करणाऱ्या व अनेक प्रकारच्या आलिंगनाविषयीं चतुर अशा स्त्रिया पूर्वपुण्यानींच एकाद्याच्या घरांत असतात.

नायं प्रयाति विकृतिं विरसो न यः स्यान्न क्षीयते
बहुजनैर्नितरां निपीतः॥ जाड्यं निहंति रुचिमेति
करोति तृप्तिं नूनं सुभाषितरसोऽन्यरसातिशायी
॥ ९॥

अर्थः- सुभाषितरस निश्चयें करून अन्यरसांपेक्षां अतिशयें अधिक आहे, कारण हा विकार पावत नसून जो कदापि विरसही होत नाहीं, बहुत लोकानीं अत्यंत प्राशन केला तरीं क्षीण होत नाहीं, मूर्खत्वाचा नाश करतो, रुचीला प्राप्त होतो आणि अंतःकरणाची तृप्ति करतो.

कथमिह मनुष्यजन्मा संप्रविशति संसदि विबु-
धगमितायां॥ येन न सुभाषितामृतमास्वादित-
माननांतमातृप्तेः॥ १०॥

अर्थः- या लोकीं ज्यानें सुभाषितरूप अमृत तृप्तिपर्यंत आकंठमर्याद सेवन केलें नाहीं तो मनुष्यजन्म घेतलेला प्राणी पंडितानीं पूर्ण भरलेल्या सभेंत कसा उत्तमरीतीनें प्रवेश करील ?

ज्ञातो जडप्रसंगात् विस्मारयति भ्रमोऽपमा-
त्मानं॥ शुभमधुनाद्रसेन च सुरसंसेव्यं भजे-

स्व चंडीशं ॥ ११ ॥

अर्थः- विश्वाच्या प्रसंगानें झालेला हा भ्रम आत्मस्वरूपास विसरि वतो त्याच्या निवारणार्थ उत्तम भक्तिरसानें, देवांनीं सेवा करण्यास योग्य अशा शंकराचें भजन कर. अथवा जलप्रसंगानें झालेलें हें भ्रमण आपल्या देहास विसरिवतें त्याच्या निवारणार्थ उत्कृष्ट मद्य व आल्याचा रस यांसह सेवन करण्यास योग्य असा चंडीश नामक उत्तम रस ग्रहण कर.

मुखेन नोद्गिरत्यूर्ध्वं हृदयान्नानयत्यधः ॥ जरयत्यंतरे साधुर्दोषं विषमिवेश्वरः ॥ १२ ॥

अर्थः- साधु इतरांच्या दोषास मुखानें बाहेर आणीत नाहीं व हृदयांतून खालींही नेत नाहीं तर तो विषास कंठांतच जीर्ण करणाऱ्या शंकरा प्रमाणें त्या दोषास मध्येंच जिरवितो.

मज्जंतोपि विपत्पयोधिगहने निःशंकधैर्यावृताः कुर्वंत्येव परोपकारमनिशं संतो यथाशक्तिवै ॥ राहोरुग्रकरालवक्त्रकुहरग्रासाभिभूतोप्यलं चंद्रः किं न जनं करोति सुखिनं ग्रासावशेषैः करैः ॥ १३ ॥

अर्थः- सत्पुरुष विपत्तिरूप समुद्राच्या संकटांत बुडत असले तरीते निःशंकधैर्यानें युक्त असून निरंतर यथाशक्ति परोपकार करीतच असतात. यास दृष्टांत, चंद्र, राहूच्या उग्र भयंकर मुखरूप गुहेच्या ग्रासानें पराभूत झाला तरी तो आपल्या ग्रासून अवशिष्ट राहिलेल्या किरणानीं लोकांस अत्यंत सुखी करीत नाहीं काय?

उपकर्तुं प्रियं कर्तुं कर्तुं स्नेहमकृत्रिमं ॥ सज्जनानां स्वभावोयं केनेंदुः शीतलीकृतः ॥ १४ ॥

अर्थः- उपकार करणें, प्रिय करणें व अकृत्रिम स्नेह करणें यां विषयीं सज्जनांचा हा स्वभावच असतो. याचा अनुभव असा कीं, चंद्र, शीतल कोणी केला? तर तो आपल्या स्वभावानेंच असा झाला आहे.

मान्या एव हि मान्यानां मानं कुर्वंति नेतरे ॥ शंभु
र्बिभर्ति मूर्ध्नेंदुं स्वर्भानुस्तं जिघृक्षति ॥ १५ ॥

**अर्थः**- मान्य जनच मान्य जनांचा सन्मान करितात, इतर करीत ना हींत, याचें उदाहरण, शंकर स्वमस्तकानें चंद्रास धारण करतात आणि राहु त्यास ग्रहण करण्यास इच्छितो.

गवादीनां पयो ऽन्येद्युः सद्यो वा जायते दधि ॥ क्षी
रोदधेस्तु नाद्यापि महतां विकृतिः कुतः ॥ १६ ॥

**अर्थः**- गायी आदिकरून प्राण्याचें दूध दुसऱ्या दिवशीं किंवा त्याच दिवशीं दहीं होतें परंतु क्षीरसागराचें तर अद्यापि दहीं होत नाहीं या वरून महतांस विकार कोठून होईल हें सिद्ध आहे.

निर्गुणेष्वपि सत्त्वेषु दयां कुर्वंति साधवः ॥ नहि
संहरति ज्योत्स्नां चंद्रश्चंडालवेश्मसु ॥ १७ ॥

**अर्थः**- साधु गुणहीन प्राण्यांवर ही दया करतात यास दृष्टांत, चंद्र आपली कांति चंडालांच्या घरांवर न जाऊं देण्याविषयीं आवरून धरीत नाहीं.

इहानेके संतः सततमुपकारिण्युपकृतिं कृतज्ञाः कु
र्वंतो जगति निवसंतो ऽपि सुधियः ॥ कियंतस्ते सं
तः सुकृतपरिपाकप्रणयिनो विना स्वार्थं येषां
भवति परकृत्यव्यसनिता ॥ १८ ॥

**अर्थः**- या लोकीं आपणावर उपकार करणारांवर सतत उपकार करणारे असून दुसऱ्यानें केलेलें कार्य जाणणारे उत्तम बुद्धिमंत असेही जगांत वास करणारे संत अनेक आहेत परंतु सुकृतसंबंधि परिणामाचें फल प्राप्त होण्याविषयीं आसक्त असून ज्यांस स्वार्थावांचून परकार्य साधना विषयीं व्यसन आहे असे साधु किती आहेत.

अपकारिषु यः साधुः स साधुः सद्भिरुच्यते ॥ उ
पकारिषु यः साधुः साधुत्वे तस्य को गुणः ॥ १९

**अर्थः**- अपकार करणारां विषयीं जो साधु तोच साधु असें सत्पुरुष म्हणतात आणि जो उपकार करणारां विषयीं साधुत्वानें वर्ततो त्याच्या

साधुत्वांत गुण कोणता ?

आदिमध्यनिधनेषु सौहृदं सज्जने भवति नेतरज्जने ॥ छेदतापननिघर्षताडनैर्नान्यभावमुपयाति कांचनं ॥ २० ॥

अर्थः- आदि मध्य व अंत्य असें तीन्ही कालांत मित्रत्व सज्जनांमध्यें रहातें इतर जनांत रहात नाहीं. यास दृष्टांत सुवर्ण तोडणें, तापविणें, घर्षण व ताडन यानीं अन्यभाव पावत नाहीं.

अर्थः सुखं कीर्तिरपीह माभूदनर्थ एवास्तु तथापि धीराः ॥ निजप्रतिज्ञामनुरुध्यमाना महोद्यमाः कर्म समारभंते ॥ २१ ॥

अर्थः- द्रव्य, सुख व कीर्ति ही या लोकीं नसो आणि अनर्थच असो तरी धीर पुरुष आपल्या प्रतिज्ञेनें बद्ध होऊन मोठ्या उद्योगानें युक्त होत्साते परोपकाराचें कार्य उत्तमरीतीनें आरंभितात.

क्षुद्राः संति सहस्रशः स्वभरणव्यापारमात्रोद्युताः स्वार्थो यस्य परार्थ एव स पुमानेकः सतामग्रणीः ॥ दुष्पूरोदरपूरणाय पिबति स्रोतःपतिं वाडवो जीमूतस्तु निदाघसंभृतजगत्संतापविच्छित्तये ॥ २२ ॥

अर्थः- स्वकीय पोषणसंबंधि व्यापाराविषयीं मात्र उद्युक्त असे सहस्रशः क्षुद्र प्राणी आहेत परंतु ज्याचा स्वार्थ परकार्यसाधनच होय असा जो पुरुष तो साधूंचा अग्रेसर एकादाच असतो याचें उदाहरण. वाडवाग्नि, दुःखानेंही पूर्ण होण्यास अशक्य अशा आपल्या उदरभरणासाठीं समुद्रास प्राशन करतो आणि मेघतर ग्रीष्मकालांतील दाहानें तप्त झालेल्या जगताच्या संतापनिवारणार्थ समुद्रोदक प्राशन करतो.

नहि भवति वियोगः स्नेहविच्छेदहेतुर्जगति गुणनिधीनां सज्जनानां कदाचित् ॥ घनतिमिरनिबद्धो दूरसंस्थोपि चंद्रः किमु कुमुदवनानां प्रे-

मभंगं करोति ॥ २३॥

अर्थः- जगांतील गुणनिधिरूप सज्जनाचा वियोग कदापि स्नेहनाशास कारण होत नाहीं यास दृष्टांत. चंद्र, दूर असूनही निबिड अंधकारानें आच्छादित झाला तरी तो आपल्या दर्शनानें विकसित होणाऱ्या कुमुदनामक शुभ्रकमलांच्या वनाचा प्रेमभंग करतो काय ?.

उदधिरवधिरुर्व्यास्तं हनूमांस्ततार निरवधि गगनं चेत् ब्रह्मांडकोशे विलीनं ॥ इतिपरिमितिमंतो भांति सर्वेऽपि भावाः स तु निरवधिरेकः सज्जनानां विवेकः ॥२४॥

अर्थः- समुद्र, पृथ्वीला अवधिरूप असून त्याचें उल्लंघन मारुतीनें केलें. तसेंच आकाश अपरिमित असूनही तें कोठें सामावलें तर ब्रह्मांडकोशांत सामावलें असे सर्वही पदार्थ परिमितीनें युक्त भासतात परंतु सज्जनांचा जो विवेक तो मात्र एक अपरिमित स्वरूपानें शोभतो.

अस्तंगतो यमरविंदवनैकबंधुर्भास्वान्न लंघयति कोपि विधिप्रणीतं ॥ हे चक्र धैर्यमवलंब्य विमुंच शोकं धीरास्तरंति विपदं न तु दीनचित्ताः २५

अर्थः- हा सूर्य आपल्या उदयानें विकसित होणाऱ्या कमलवनांचा अनन्यबंधु असून अस्तास गेला, कारण ब्रह्मलिखित उल्लंघन करण्यास कोणीही समर्थ नाहीं, यास्तव हे चक्रवाका, धैर्य अवलंबून शोकाचा त्याग कर. कारण धैर्यवंत लोकच विपत्तींत तरतात परंतु दीनचित्त लोक विपत्तींत तरत नाहींत.

उत्तुंगमत्तमातंगमस्तकन्यस्तलोचनः ॥ आसन्नेपि च सारंगे न वांछां कुरुते हरिः ॥ २६ ॥

अर्थः- श्रेष्ठ मदोन्मत्त हत्तीच्या मस्तकावर दृष्टि ठेवणारा सिंह आपल्याजवळ हरिण असला तरी त्याची इच्छा करीत नाहीं.

यद्यपि चंदनविटपी विधिना फलकुसुमवर्जितो हि कृतः ॥ निजवपुषैव परेषां तथापि संतापमपनयति ॥२७॥

अर्थः- जरी चंदनवृक्ष ब्रह्मदेवानें फलपुष्प रहित केला आहे तथापि तो आपल्या देहानेंच इतरांच्या तापाचें निवारण करतो.

विषभारसहस्रेण गर्वं नायाति वासुकिः ॥ वृ-
श्चिको बिंदुमात्रेण ऊर्ध्वं वहति कंटकं ॥ २८ ॥

अर्थः- वासुकी विषयुक्त सहस्रफणांच्या भारानें गर्व पावत नाहीं आणि वृश्चिक ( विंचु ) बिंदुमात्र विषानें आपले नांगीचा कांटा वर धरतो.

दिव्यं चूतरसं पीत्वा गर्वं नायाति कोकिलः ॥ पी-
त्वा कर्दमपानीयं भेको रटरटायते ॥ २९ ॥

अर्थः- कोकिलपक्षी उत्कृष्ट आम्ररस प्राशन करूनही गर्व पावत नाहीं आणि बेडूक चिखलाचें पाणी पिऊन रटरट असा बहुत कर्कश शब्द करितो.

काकस्य गात्रं यदि कांचनस्य माणिक्यरत्नं यदि
चंचुदेशे ॥ एकैकपक्षे ग्रथितं मणीनां तथापि का-
को न तु राजहंसः ॥ ३० ॥

अर्थः- काकपक्ष्याचें अंग जरी सुवर्णमय व माणिकरत्न जरी चोंचीचे ठिकाणीं असून त्याच्या एकेका पंखाच्या स्थानीं रत्नमणि जरी गुंफले असले तथापि तो कावळा राजहंस होत नाहीं.

सच्छिद्रनिकटे वासो न कर्तव्यः कदाचन ॥ घ-
टी पिबति पानीयं ताड्यते झल्लरी यथा ॥ ३१ ॥

अर्थः- छिद्रयुक्ताच्या समीप वास कदापि करूं नये. कारण, घटिका नांवाचें पात्र पाणी पितें आणि तत्सहवासक घड्याळास ताडन होतें यास्तव.

कैवर्तकर्कशकरग्रहणच्च्युतोऽपि जालांतरे नि-
पतितः शफरो वराकः ॥ दैवात्ततो विगलितो गि-
लितो बकेन वक्रे विधौ वद कथं व्यवसायसिद्धिः ३२

अर्थः- दीन मत्स्य कोळ्याच्या कठोर हातानें घेण्यातून सुटला असूनही दुसऱ्या जाळ्यांत पडला, त्यांतूनही गळून पडला तरी तेथें दैववशात् त्यास बकपक्ष्यानें गिळिलें. तस्मात् दैव विरुद्ध झालें असतां उ-

द्योगाची सिद्धि कशी होईल हें सांग.

भवंति नम्रास्तरवः फलोद्गमैर्नवांबुभिर्भूरिविलंबिनो घनाः ॥ अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः स्वभाव एवैष परोपकारिणां ॥ ३३ ॥

अर्थः- वृक्ष फलोत्पत्तीनें नम्र होतात. मेघ नूतन उदकानें आपल्या मंडलांतून खालीं येतात तसेंच सत्पुरुष बहु संपत्तीनीं उद्धत होत नाहींत तस्मात् नम्र होणें हा परोपकार करणारांचा स्वभावच आहे.

श्रोत्रं श्रुतेनैव न कुंडलेन दानेन पाणिर्न तु कंकणेन ॥ विभाति कायः खलु सज्जनानां परोपकारैर्न तु चंदनेन ॥ ३४ ॥

अर्थः- कर्ण शास्त्रश्रवणानें शोभतात कुंडलानें शोभत नाहींत. हात दानानेंच शोभतो कंकणानें शोभत नाहीं तसाच सज्जनांचा देह परोपकारानींच शोभतो चंदनानें शोभत नाहीं.

पद्माकरं दिनकरो विकचं करोति चंद्रो विकासयति कैरवचक्रवालं ॥ नाभ्यर्थितो जलधरोपि जलं ददाति संतः स्वयं परहितेषु कृताभियोगाः ॥ ३५

अर्थः- सूर्य सरोवरांतील कमलसमुदायास प्रफुल्लित करतो. चंद्रक नामक शुभ्र कमलसमूहास विकासित करतो आणि मेघही प्रार्थने वांचून जल देतो तसेंच संत स्वयें परहिता विषयीं अतिशयें प्रयत्न करीत असतात.

गुरुरेकः कविरेकः सदसि मघोनः कलाधरोप्येकः ॥ अद्भुतमत्र सभायां गुरवः कवयः कलाधराः सर्वे ॥ ३६ ॥

अर्थः- इंद्राच्या सभेंत गुरु ( बृहस्पति ) एक असून कवि ( शुक्राचार्य ) एक व कलाधर ( चंद्र ) ही एक आणि या भोजराजाच्या सभेंत तर सर्व गुरु, सर्व कवि व सर्व कलाधर ( कलावंत ) आहेत हें अद्भुत आहे.

यो वर्तते शुचित्वेन स वैश्वानर उच्यते ॥ यो व-

वर्तते ऽशुचित्वेन सवै श्वा नर उच्यते ॥ ३७ ॥

अर्थः- जो पवित्रत्वें करून वर्ततो तो अग्नीसमान शुद्ध म्हणावा आणि जो अशुचित्वानें वागतो तो मानव निश्चयें करून श्वानासारखा अशुचि म्हणावा.

दोषाकरः शिरसि ते ऽस्ति गले द्विजिव्हः पाषा
गजा सहचरी पशुरंतरंगः ॥ दुःखं निवेदयति,
को मम दीनबंधो त्वंचेत् त्रिलोचन निमीलित
लोचनो ऽसि ॥ ३८ ॥

अर्थः- हे त्रिनेत्र शंकरा, तुझ्या मस्तकावर दोषाकर (दोषाचा आकर किंवा रात्र करणारा) चंद्र असून गळ्यांत वासुकि सर्प, समागमें असणारी पार्वती पाषाणकन्या, पशु अंतरंग असें असून हे दीनबंधो तूं जर नेत्र झांकलेस तर माझें दुःख तुला कोण निवेदन करील?

क्वांभोधौ जन्म क्व च वपुरिदं कुंदधवलं क्व चावा
सस्थानं कृतमहह विष्णोः करतलं ॥ क्व नीचाना-
मास्ये परिणतिरियं चुंबनविधावितीवायं शंखः
करुणंकरुणं रोदिति मुहुः ॥ ३९ ॥

अर्थः- समुद्रांत उत्पत्ति हें कोणीकडे तसेंच कुंदपुष्पासारिखें शुभ्र शरीर हें कोणीकडे व विष्णूच्या तळहातावर राहण्याचें स्थान केलें हें कोणीकडे आणि नीचांच्या मुखांतील चुंबनप्रकारांत हा खेदकारक परिणाम प्राप्त झाला हें कोणीकडे अशा आशयानेंच काय हा शंख अत्यंत दैन्य युक्त स्वरानें वारंवार रोदन करतो.

गर्वं मा कुरु शर्करे तव गुणान् जानंति राज्ञां गृहे
ये दीना धनवर्जिताश्च कृपणाः स्वप्ने ऽपि पश्यं-
तिनो ॥ आम्रो ऽहं मधुकूपकेर्मम फलैस्तृप्ता हि
सर्वे जना हेरंडे तव किं गुणो मम फलैस्तुल्यं न
किंचित्फलं ॥ ४० ॥

अर्थः- हे शर्करे गर्व करूं नको. कारण, तुझ्या गुण स राजांच्या घरीं जाणतात आणि जे निर्धन, दीन व लोभी ते स्वप्नीं ही तुला पहात नाहीं-

न आणि मी आम्रवृक्ष असून माझ्या मधासारख्या मधुर फलांनीं सर्व जन तृप्त होतात. तस्मात् हेरंडे तुझे गुण मजपुढें काय आहेत, कारण माझ्या फलांशीं समान असें कोणतेंच फल नाहीं.

धातस्तात तवैव दूषणमिदं यन्नाम कस्तूरिका
कांतारांतरचारिणां तृणभुजां यन्नाभिमूले कृ-
ता ॥ यद्येवं पिशुनस्य हंत रसनामूले करिष्यस्त-
दा प्रायासेन विना भविष्यदतुला कीर्तिश्च निर्दो
षता ॥ ४१ ॥

अर्थः- हे तात ब्रह्मदेवा, अरण्यांत संचार करीत असून तृण भक्षण करणाऱ्या हरिणांच्या नाभिमूलस्थानीं जी कस्तूरी उत्पन्न केली हें तुह्मासच प्रसिद्ध खेदास्पद दूषण आहे. कारण, अशी ही कस्तूरी जर दुर्जनाच्या जिव्हामूलाच्या ठिकाणीं केली असती तर अति आयासावांचून अप्रतिम कीर्ति होऊन निर्दोषता घडली असती.

यत्रात्मीयो जनो नास्ति भेदस्तत्र न विद्यते ॥ कु
ठारैर्दंडनिर्मुक्तैर्भिद्यंते तरवः कथं ॥ ४२ ॥

अर्थः- जेथें स्वकीय जन नाहीं तेथें भेद होत नाहीं. याचा अनुभव असा कीं, दांड्यापासून निघालेल्या कुऱ्हाडीनीं वृक्षांचें कसें छेदन होईल.

तेवे सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थं परित्यज्य ये
सामान्यास्तु परोपकारनिरताः स्वार्थाविरोधेन ये
॥ तेऽमी मानुषराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नंति
ये ये तु घ्नंति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥ ४३

अर्थः- जे स्वार्थाचा त्याग करून परकीय कार्याची घटना करतात ते सत्पुरुष जाणावे आणि जे स्वार्थाशीं विरोध नयेतां परोपकारा विषयीं तत्पर असतात ते सामान्य पुरुष जाणावे. तसेंच जे स्वार्थासाठीं परहिताचा नाश करतात ते हे मनुष्यांतील राक्षस समजावे व जे निष्कारण परहिताचा नाश करतात ते कोण हें आह्मी जाणत नाहीं.

दह्यमानाः सुतीक्ष्णेन नीचाः परयशोग्निना ॥ अ
शक्तास्तत्पदं गंतुं ततो निंदां प्रकुर्वते ॥ ४४ ॥

अर्थः- दुर्जन, अतितीक्ष्ण अशा परकीर्तिरूप अग्नीनें संतप्त होऊन त्या सज्जनाच्या पदास प्राप्त होण्याविषयीं अशक्त असून पश्चात् ते साधूंची निंदा करतात.

वाङ्माधुर्यान्नान्यदस्ति प्रियत्वं वाक्पारुष्या-
च्चोपकारोऽपि नष्टः ॥ किं तेन द्रव्यं कोकिलेनोप
नीतं को वा लोके गर्दभस्यापराधः ॥ ४५ ॥

अर्थः- मधुर वाणी सारखें दुसरें प्रिय नाहीं आणि कठोर वाणीनें उपकारही नाश पावतो. याचा अनुभव असा कीं, कोकिल पक्ष्यानें काय तें द्रव्य आणिलें अथवा लोकांत गर्दभाचा अपराध कोणता आहे.

जरा रूपं हरति हि धैर्यमाशा मृत्युः प्राणान् ध-
र्मचर्यामसूया ॥ कामो ह्रियं वृत्तमनार्यसेवा क्रो
धः श्रियं सर्वमेवाभिमानः ॥ ४६ ॥

अर्थः- जरा रूपास, आशा धैर्यास, मृत्यु प्राणास, असूया धर्माचरणास, काम लज्जेस, दुर्जनसेवा सदाचरणास, क्रोध संपत्तीस व अभिमान सर्वांसच अशा रीतीनें एकास एक हरण करतात.

ज्यायांसमपि शीलेन विहीनं नैव पूजयेत् ॥ अ-
पि शूद्रं च धर्मज्ञं सद्वृत्तमभिपूजयेत् ॥ ४७ ॥

अर्थः- श्रेष्ठ असूनही शीलानें (सुस्वभाव व सदाचरण यानीं) हीन असेल तर त्याची पूजा करूं नये, आणि शूद्र असून तो धर्मज्ञाता व सदाचरणयुक्त असेल तर त्याचा सन्मान करावा.

ज्वलति चलितेंधनोऽग्निर्विप्रकृतः पन्नगः फणां
कुरुते ॥ प्रायः स्वं महिमानं क्षोभात्प्रतिपद्यते जं-
तुः ॥ ४८ ॥

अर्थः- अग्नीचीं काष्ठें हालविलीं असतां तो प्रज्वलित होतो. दुखविलेला सर्प फणा काढितो. यावरून असें सिद्ध होतें कीं, प्राणी आपली प्रतिष्ठा प्रायः क्षोभानें पावतो.

वरं बाल्ये मृत्युर्न पुनरधनं यौवनमिदं वरं भा-
र्या वेश्या न पुनरविनीता कुलवधूः ॥ वरं देशत्या

गो न पुनरविवेकिप्रभुपुरं वरं देहत्यागो न पुनर
धर्मागारसदनं ॥ ४९ ॥

अर्थ- बाल्यावस्थेंत मृत्यु चांगला परंतु हें धनहीन तारुण्य उपयोगि नाहीं. वेश्या भार्या उत्तम परंतु उद्धत कुलस्त्री बरी नाहीं. देशत्याग बरा परंतु अविचारिराजाचें नगर उपयोगि नाहीं. देहत्याग बरा परंतु दुर्जनाच्या घरीं जाणें चांगलें नाहीं.

दूरेऽपि श्रुत्वा भवदीयकीर्तिं कर्णौ हि तृप्तौ न
च चक्षुषी मे ॥ तयोर्विवादं परिहर्तुकामः समाग
तोऽहं तव दर्शनाय ॥ ५० ॥

अर्थ- हे राजन् तुझी कीर्ति दुरूनही ऐकून माझे कर्ण तृप्त झाले परंतु नेत्र तृप्त झाले नाहींत यास्तव त्या कर्णनेत्रांचा विवाद दूर करण्यासाठीं मी तुझ्या दर्शनार्थ आलों.

त्वत्कीर्तिमौक्तिकफलानि गुणैस्त्वदीयैः संदर्भि
तुं विबुधवामदृशः प्रवृत्ताः ॥ नांतो गुणेषु न च
कीर्तिषु रंध्रलेशो हारो न जात इति ताश्च मिथो
हसंति ॥ ५१ ॥

अर्थ- हे परमेश्वरा, तुझीं कीर्तिरूप मुक्ताफळें तुझ्याच गुणरूप सूत्रानीं गुंफण्या विषयीं देवांगना प्रवृत्त झाल्या परंतु त्या गुणरूप सूत्रांचा अंत नाहीं व त्या कीर्तिमुक्ताफळांस कोठें लेशमात्रही छिद्र नाहीं म्हणून हार झाला नाहीं यास्तव त्या स्त्रिया परस्परें हास्य करूं लागल्या.

तीव्रो निदाघसमयो बहुपथिकजनश्च मारवः
पंथाः ॥ मार्गस्थिततरुरेकः कियतां संतापमप
हरति ॥ ५२ ॥

अर्थ- उष्णप्राप्तिसमय तीक्ष्ण आणि बहुत पांथजनांनीं युक्त मरुनामक निर्जलदेशांतील मार्ग असें असून त्या मार्गांतील एक वृक्ष किती एकांच्या संतापास दूर करितो.

छायावंतो गतव्यालाः स्वारोहाः फलदायिनः ॥

मार्गद्रुमा महांतश्च परेषामेव भूतये ॥ ५३ ॥

अर्थः- छायायुक्त, सर्प रहित, उत्तम रीतीनें उंच गेलेले आणि फलें देणारे असे मार्गातील वृक्ष व महात्मे हे इतरांसच संपत्तिकारक होतात.

भुक्त्वा स्वादुफलं कृतं च शयनं शाखाग्रजैः पल्लवै
स्त्वच्छायापरशीतलं सुसलिलं पीतं व्यपेतश्रमैः ॥
विश्रांताः सुचिरं परं सुमनसः प्रीतिः किमन्योच्यते
त्वं सन्मार्गतरुर्वयं च पथिका यामः पुनर्दर्शनं ॥
॥ ५४ ॥

अर्थः- हे वृक्षा, तुझें मधुर फल भक्षण करून शाखांच्या अग्रसंबंधि कोमल पानांनीं शय्या करून तिजवर शयन केलें. तसेंच श्रमपरिहारानंतर तुझ्या छायेनें अत्यंत शीतल झालेलें सुंदर उदक प्राशन केलें. बहुकाल विश्रांतीही पावलों आणि पुष्पसंबंधानें उत्तम संतोष झाला तेव्हां आह्मी ह्या तुझ्या उपकारा विषयीं काय बोलावें तस्मात् तूं सन्मार्गातील वृक्ष असून आह्मी पांथ आहों यास्तव तुझ्या पुनः दर्शनास येऊं.

भुक्तानि येस्तव फलानि पलाशिमानि क्रोडस्थि
तैरहह वीतभयैः प्रसुप्तं ॥ ते पक्षिणो जलरयेण
विकृष्यमाणं पश्यंति पादप भवंतमसी तटस्थाः ५५

अर्थः- हे वृक्षा, ज्यांनीं तुझीं पक्व फलें भक्षण केलीं आणि तुझ्या ढोलींत राहून निर्भयपणें अपूर्व निद्रा केली. ते हे पक्षी तूं जलाच्या वेगानें आकर्षण पावत असतां तुजकडे तटस्थ ( तीरावर बसून व तटस्थवृत्ति ) होऊन पाहतात.

मंदमंदगमना करिणी किं वा विशालनयना हरि
णी किं ॥ पूर्णचंद्रवदना रजनी किं पश्य गच्छति
सखे तरुणी किं ॥ ५६ ॥

अर्थः- मंदमंद गमन करणारी ही हत्तीण आहे काय ? किंवा विशाल नेत्र असल्या वरून हरिणी आहे काय ? अथवा पूर्णचंद्र सदृश मुखानें सुशोभित असल्यामुळें रात्रि आहे काय ? हे मित्रा, ही तरुणस्त्री

गमन करीत आहे काय ? पहा.

अलिरयं नलिनीदलमध्यगः कमलिनीमकरंदम
दालसः ॥ विधिवशात्परदेशमुपागतः कुटजपुष्प
रसं बहु मन्यते ॥ ५७ ॥

अर्थः- हा भ्रमर कमलिनीच्या दलाचे मध्यभागीं जाऊन कमलिनीसंबंधि पुष्परस प्राशन करून त्या मदानें आलस्ययुक्त झाला होता तो पुढें दैववशात् परदेशांत प्राप्त झाला असतां कुड्याच्या फुलांतील रसालाच बहुमानानें मानतो.

सोमकांतो मणिः स्वच्छः सूर्यकांतस्तथा न किं
॥ उद्गारे तु विशेषोस्ति तयोरमृतवन्हयः ॥ ५८ ॥

अर्थः- चंद्रकांत मणि स्वच्छ आहे तसा सूर्यकांत मणि स्वच्छ नाहीं काय ? आहे परंतु त्यांच्या उद्गारांत विशेष आहे तो असा कीं, चंद्रकांतापासून जलस्राव होतो आणि सूर्यकांतापासून अग्नि निघतो.

स्वयमप्राप्तदुःखो यः स दुनोति न विस्मयः ॥ त्वं
स्मरप्राप्तदाहोऽपि दहसीति किमुच्यते ॥ ५९ ॥

अर्थः- स्वतः ज्यास दुःख प्राप्त झालें नाहीं तो इतरांस दुःख देतो यांत आश्चर्य नाहीं. कसें ! तर हे मदना, तुला दाहसंबंधि दुःख प्राप्त झालें असूनही तूं कामव्यथेनें लोकांस ताप देतोस या विषयीं आह्मी काय बोलावें.

बकुलमालिकयाऽपि न सा मया तनुरभूषित
दंतरभीरुणा ॥ तदधुना विधिना कथमावयोर्गि
रिनदीनगरीशतमंतरं ॥ ६० ॥

अर्थः- पतीशीं जो संयोग त्यांत अंतर पडेल या भीतीमुळें मीं आपली तनु बकुलपुष्पांच्या मालेनें ही अलंकृत केली नाहीं तें या काळीं देवानें शतशः पर्वत, नद्या व नगरी इतकें अंतर आह्मा उभयतांत कसें पाडिलें.

यत्त्वन्नेत्रसमानकांति सलिले मग्नं तदिंदीवरं
मेघैरंतरितः प्रिये तव मुखच्छायानुकारी शशी

।। ये ऽपि त्वद्गमनानुसारिगतयस्ते राजहंसा गे-
तास्त्वत्सादृश्यविनोदमात्रमपि मे दैवेन न क्षम्य
ते ।। ६१ ।।

अर्थः- हे प्रिये सीते, तुझ्या नेत्रासमान कांतीनें युक्त जें नीलकमल तें पर्जन्यामुळें उदकांत बुडालें, तसाच तुझ्या मुखाचें किंचित् सादृश्य धारण करणारा चंद्र मेघांनीं आच्छादित झाला आणि तुझ्या गमनानुरूप मंद गमन करणारे जे राजहंस तेही मानससरोवरीं गेले तस्मात् तुझें किंचित् साम्य धारण करणाऱ्या पदार्थांशीं केवल विनोदही माझ्या दैवानें सहन केला नाहीं.

कस्येयं तरुणि प्रपा पथिकिनः किं पीयते ऽस्यां
पयो धेनूनामथ माहिषं बधिर रे वारः कथं मंग
लः ।। सोमो वा ऽथ शनैश्चरो ऽमृतमिदं तत्ते ऽध-
रे दृश्यते श्रीमत्पांथ विलाससुंदर सखे यद्रोच
ते तत् पिब ।। ६२ ।।

अर्थः- हे तरुणि ही उदकशाला कोणाची आहे? पांथ्याची. या शाळेंत काय पिण्यास मिळतें पय. तें गायींचें किंवा म्हशींचें. हे बहिऱ्या (वार) काय मंगळ, सोम किंवा शनि? नव्हे हें अमृत. तें तुझ्या अधरोष्ठस्थानीं दिसत आहे तें कीं काय? तर हे श्रीमत्पांथा, विलाससुंदरा, मित्रा जें तुला रुचेल तें प्राशन कर.

तव कुसुमशरत्वं शीतरश्मित्वमिंदोर्द्वयमिदम
यथार्थं दृश्यते मद्विधेषु ।। विसृजति हिमगर्भै-
रग्निमिंदुर्मयूखैस्त्वमपि कुसुमबाणान् वज्रसा
री करोषि ।। ६३ ।।

अर्थः- हे मदना, तुझे बाण पुष्पें आणि हे चंद्रा, तुझे किरण शीतल हे दोन्ही प्रकार मजसारिख्या विरहिजनांच्या ठिकाणीं यथार्थ अनुभवास येत नाहींत. कारण चंद्र गर्भी शीतयुक्त किरणानीं मजवर अग्नि वर्षतो आणि तूंही पुष्पबाण वज्रासारखे अति कठोर करतोस.

तृणं चाहं वरं मन्ये नरादनुपकारिणः ।। घासो

भूत्वा पश्रून् पाति भीरून् पाति रणांगणे ॥ ६४

अर्थः- मी तृणास अनुपकारि मनुष्यापेक्षां श्रेष्ठ मानतों, कारण तें घास होऊन पशूंचें रक्षण करतें आणि रणांगणीं भयभीतांसर क्षण करतें.

सहि गगनविहारी कल्मषध्वंसकारी दशशतक रधारी ज्योतिषां मध्यचारी ॥ विधुरपि विधियोगात् ग्रस्यते राहुणाऽसौ लिखितमपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः ॥ ६५ ॥

अर्थः- चंद्र आकाशांत संचार करणारा असून पापनाशक, असंख्य किरणानीं युक्त व नक्षत्रांच्या मध्यभागीं संचार करणारा असा असून तोही दैवयोगें राहूनें ग्रासला जातो तस्मात् ललाटीं लिहिलेंही टाकण्या विषयीं कोण समर्थ आहे.

एता हसंति च रुदंति च वित्तहेतोर्विश्वासयंति पुरुषं न च विश्वसंति ॥ तस्मान्नरेण कुलशीलसमन्वितेन वेश्याः श्मशानघटिका इव वर्जनीयाः ॥ ६६

अर्थः- वेश्या द्रव्यहेतूनें हसतात, रुदन करतात, पुरुषास आपल्य विषयीं विश्वासयुक्त करितात व आपण स्वतः त्यावर विश्वास ठेवीत नाहींत यास्तव कुलशीलसंपन्न पुरुषानें त्या श्मशानांतील घागरी सारख्या स्पर्शाविषयींही वर्जाव्या.

पंचभिः सह गंतव्यं स्थातव्यं पंचभिः सह ॥ पंचभिः सह वक्तव्यं न दुःखं पंचभिः सह ॥ ६७ ॥

अर्थः- पांचांसह वर्तमान गमन करावें; पांचांसह बसावें; पांचांसह भाषण करावें, कारण पांचां समागमें दुःख नाहीं.

गुणिनां निर्गुणानां च दृश्यते महदंतरं ॥ हारः कंठगतः स्त्रीणां नूपुराणिच पादयोः ॥ ६८ ॥

अर्थः- गुणी व गुणरहित यां मध्यें महत् अंतर दिसतें. यास उदाहरण. हार गुणी+ असल्यामुळें तो स्त्रियांच्या कंठांत असतो

+ सूतांत गुंफलेला. मनुष्यपक्षीं गुणयुक्त मनुष्य.

व नूपुरें गुणरहित असल्यामुळें तीं त्यांच्या पायांत असतात.

मक्षिकामशको वेश्या मूषको याचकस्तथा ॥ ग्रा
मणीर्गणकश्चैव सप्तैते परभक्षकाः ॥ ६९ ॥

अर्थः- माश्या, मशक, वेश्या, उंदीर, याचक तसाच नापित व ज्योति
षी हे सात दुसऱ्याचें भक्षण करणारे आहेत.

एकं दृष्ट्वा शतं दृष्ट्वा दृष्ट्वा पंचशतान्यपि ॥ अ
तिलोभो न कर्तव्यश्चक्रं भ्रमति मस्तके ॥ ७० ॥

अर्थः- एक पाहून शंभर पाहून पांचशेंही पाहून अतिलोभ करूं
नये; कारण तेणें करून मस्तकावर चक्र भ्रमण करतें.

निद्राप्रियो यः स तु कुंभकर्णो हतः समीके रघुनं
दनेन ॥ ततोऽस्य पत्नी विधवा प्रजाता श्रोतुं
समायाति कथां पुराणं ॥ ७१ ॥

अर्थः- निद्राप्रिय जो कुंभकर्ण तो तर रामानें संग्रामांत मारला
त्यामुळें त्याची पत्नी विधवा झाली तेव्हां ती कथा व पुराण यां-
च्या श्रवणार्थ येते.

नवे वयसि यः शांतः स शांत इति मे मतिः ॥ धा
तुषु क्षीयमाणेषु शांतिः कस्य न जायते ॥ ७२ ॥

अर्थः- जो तरुण वयांत शांत तो शांत अशी माझी मति आहे;
कारण शरीरांतील धातु क्षीण झाल्यावर कोणास शांति होत ना-
हीं? सर्वांस होते.

अर्था हसंत्युचितदानविहीनलुब्धं भूम्यो हसंति
मम भूमिरिति ब्रुवाणं ॥ जारा हसंति तनयानुप
लालयंतं मृत्युर्हसत्यवनिपं रणरंगभीरुं ॥ ७३ ॥

अर्थः- द्रव्यें योग्यदानरहित लोभ्यास हसतात. भूमी, माझी पृ-
थ्वी असें बोलणारास हसतात. जार, बालकांचें लालन करणाऱ्या
पित्यास हसतात व मृत्यु रणांतील रंगाविषयीं भित्रा अशा राजा
स हसतो.

ऋणकर्ता पिता शत्रुर्माता च व्यभिचारिणी ॥

भार्या रूपवती शत्रुः पुत्रः शत्रुरपंडितः ॥ ७४॥

अर्थः- ऋण करणारा पिता शत्रु, व्यभिचार करणारी माता शत्रु, रूपसंपन्न पत्नी शत्रु आणि मूर्ख पुत्र शत्रु असें जाणावें.

लुब्धानां याचकः शत्रुश्चोराणां चंद्रमा रिपुः॥जा
रस्त्रीणां पतिः शत्रुर्मूर्खाणां बोधको रिपुः॥७५

अर्थः- याचक लोभ्यांस शत्रु, चंद्र चोरांस शत्रु, व्यभिचारिणी स्त्रियांस पति शत्रु व मूर्खांस बोध करणारा शत्रु असें भासतें.

पिता रत्नाकरो यस्य लक्ष्मीर्यस्य सहोदरी॥
शंखो रोदिति भिक्षार्थी नादत्तमुपतिष्ठति॥७६

अर्थः- समुद्र ज्याचा पिता व लक्ष्मी ज्याची भगिनी असा शंख भिक्षार्थी होऊन शब्द करितो यावरून सिद्ध होतें कीं दिल्यावांचून प्राप्त होत नाहीं.

स्वदेशजातस्य नरस्य नूनं गुणाधिकस्यापि भवेदवज्ञा॥ निजांगना यद्यपि रूपराशिस्तथाऽपि लोकः परदारसक्तः॥७७॥

अर्थः- स्वदेशांत झालेला पुरुष गुणानीं अधिक असला तरी त्याचा अवमान निश्चयें करून होतो. याचें उदाहरण असें कीं, स्वस्त्री जरी रूपाची केवळ राशिभूत असली तरी लोक परस्त्रीविषयीं आसक्त असतात.

सर्वोद्वेगकरं मृगादनमसुं संत्यज्य हा धिक् त्वया लोकस्यानपकारिणं गिरिनदीतीराटवीनिलयं॥ अश्रांतं तृणभेणशावमदयं व्याध घ्नतासुं वृथा देवो दुर्बलघातकोऽयमिति सा गाथा यथार्थीकृता॥७८॥

अर्थः- हे व्याधा तूं, सर्वांस त्रासकारक अशा सिंहास सोडून लोकांस अपकार न करणारा, पर्वत किंवा नद्या यांच्या तीरीं अथवा अरण्यांत स्वरवें करून असणारा व तृणभक्षी अशा हरिणबालकास निर्दयपणें व्यर्थ मारून, देव दुर्बलघातक आहे

शी जी लोकांतील खेदास्पद गाथा ती सत्य केलीस तस्मात् तुला धिक्कार असो.

को न याति वशं लोके मुखे पिंडेन पूरितः॥ मृदं गो मुखलेपेन करोति मधुरध्वनिं॥७९॥

अर्थः- पिंडानें मुखाच्या ठिकाणीं पूर्ण केला असतां लोकांत कोण वश होत नाहीं. याचा अनुभव असा कीं, मृदंग मुखस्थानीं लेप केल्यानें मधुर ध्वनि करतो.

न कश्चिदपि जानाति किं कस्य श्वो भविष्यति ॥अतः श्वः करणीयानि कुर्यादद्यैव बुद्धिमान्॥८०

अर्थः- उद्यां कोणाचें काय होणार हें कोणीही जाणत नाहीं यास्तव बुद्धिमानानें उद्यां कर्तव्य जीं कार्यें तीं आजच करावीं.

येषां श्रीमद्यशोदासुतपदकमले नास्ति भक्तिर्नराणां येषामाभीरकन्याप्रियगुणकथने नानुरक्ता रसज्ञा॥ येषां श्रीकृष्णलीलाललितगुणरसे सादरौ नैव कर्णौ धिक् तान् धिक् तान् धिगेतान्निति वदति सदा कीर्तनस्थो मृदंगः॥८१॥

अर्थः- श्रीमद्यशोदानंदन चरणकमलाच्या ठिकाणीं ज्या मानवांची भक्ति नाहीं व गोपकन्याप्रिय श्रीकृष्णाच्या गुणकथना विषयीं ज्यांची जिव्हा आसक्त नसून ज्यांचे कर्ण श्रीकृष्णाच्या लीलासंबंधि सुंदर गुणरस श्रवणाविषयीं आदरयुक्त नाहींतच त्यांस धिक्कार असो. त्यांस धिक्कार असो त्यांस धिक्कार असो असें निरंतर कीर्तनांतील मृदंग बोलतो.

किं चित्रं यदि राजनीतिकुशलो राजा भवेद्धार्मिकः किं चित्रं यदि वेदशास्त्रनिपुणो विप्रो भवेत् पंडितः॥ तच्चित्रं यदि रूपयौवनवती साध्वी भवेत् कामिनी तच्चित्रं यदि निर्धनोपि पुरुषः पापं न कुर्यात् क्वचित्॥८२॥

अर्थः- जर धार्मिक राजा राजनीतींत कुशळ होईल तर यांत

आश्चर्य काय ? तसाच वेदशास्त्रनिपुण ब्राह्मण पंडित जर हो ईल तर यांत आश्चर्य काय ? परंतु रूप व तारुण्य यानीं संपन्न स्त्री जर पतिव्रता होईल तर तें आश्चर्य आहे आणि जर पुरुष निर्दयही असून कुचित पाप नकरील तर तें आश्चर्य आहे.

अमंत्रमक्षरं नास्ति नास्ति मूलमनौषधं ॥ अयो
ग्यः पुरुषो नास्ति योजकस्तत्र दुर्लभः ॥ ८३ ॥

अर्थः- अक्षरमात्र मंत्रावांचून नाहीं. मूळ औषधाखेरीज नाहीं व पुरुष अयोग्य नाहीं परंतु त्यां विषयीं योजना करणारा मात्र दुर्लभ आहे.

परोपदेशवेलायां शिष्टाः सर्वे भवंति वै ॥ विस्म-
रंतीह शिष्टत्वं स्वकार्ये समुपस्थिते ॥ ८४ ॥

अर्थः- सर्वलोक परोपदेश कालीं शिष्ट होतात परंतु स्वकार्य उपस्थित झालें असतां ते त्या वेळेस शिष्टत्व विसरतात.

अविवेकिनि भूपाले नश्यंति गुणिनां गुणाः ॥
हावभावाः पुरंध्रीणां भर्तरीव नपुंसके ॥ ८५ ॥

अर्थः- पति नपुंसक असतां जसे स्त्रियांचे हावभाव नाश पावतात तसे अविवेकी राजा असतां गुणिजनांचे गुण नाश पावतात.

दंतावलिर्विगलिता गलितं शरीरं केशाश्च फेन
धवला न हि मे विषादः ॥ एणीदृशो युवतयः
पथि मां विलोक्य तातेति भाषणपराः शतकुं
तपातः ॥ ८६ ॥

अर्थः- दंतपंक्ति पडली, शरीर गलित झालें, केश फेसासारखे शुभ्र झाले तरी मला खेद नाहीं. तर मृगनयना तरुणस्त्रिया मला मार्गांत पाहून हे तात असें भाषण करतात हें शंभर भाले मारल्या सारखें दुःखकारक होतें.

कमलकूतनया वदनांबुजे वसतु ते कमला
करपल्लवे ॥ वपुषि ते रमता कमलागजः मतिं
दिनं हृदये कमलापतिः ॥ ८७ ॥

अर्थः- हे राजन् तुझ्या मुखकमलांत सरस्वती वास करो, तुझ्या करपल्लवांत लक्ष्मी वसो, तुझ्या देहांत मदन रममाण होवो व हृदयांत लक्ष्मीपति नित्यशः रममाण होवो.

अश्विनी वसतु भूप मंदुरे मंदिरे वसतु ते पुनर्वसु ॥ रेवतीपतिकनिष्ठसेवया कृत्तिकासुतपराक्रमो भव ॥ ८८ ॥

अर्थः- हे राजा, तुझ्या अश्वशालेंत अश्विनी वसो, तुझ्या मंदिरांत पुनः वसु ( धन ) वास करो आणि बलरामानुजश्रीकृष्णा सेवेनें तूं कार्तिकस्वामी समान पराक्रमी हो.

यथा यथा भोज यशो विवर्धते सितां त्रिलोकीमिव कर्तुमुद्यतं ॥ तथा तथा मे हृदयं विदूयते प्रियालकालीधवलत्वशंकया ॥ ८९ ॥

अर्थः- हे भोजराजा, तुझें यश त्रैलोक्यास शुभ्र करण्यासाठींच काय उद्युक्त होऊन जसजसें वाढत आहे. तसतसें स्त्रियांच्या केशपंक्तीला शुभ्रवर्ण प्राप्तीच्या शंकेनें माझें चित्त दुःखित होतें.

यत्रास्ति लक्ष्मीर्विनयो न तत्र अभ्यागतो यत्र न तत्र लक्ष्मीः ॥ उभौ च तौ यत्र न तत्र विद्या नैकत्र सर्वो गुणसन्निपातः ॥ ९० ॥

अर्थः- जेथें संपत्ति आहे तेथें नम्रता नाहीं व जेथें अभ्यागत आहे तेथें लक्ष्मी नाहीं आणि ते दोन्ही प्रकार जेथें असतात तेथें विद्या नसते तस्मात् सर्व गुणसमुदाय एकत्र नसतो.

अमृतं दुर्लभं नृणां देवानामुदकं तथा ॥ पितॄणां दुर्लभः पुत्रस्तक्रं शक्रस्य दुर्लभं ॥ ९१ ॥

अर्थः- मनुष्यांस अमृत दुर्लभ, तसें देवांस उदक दुर्लभ, पितरांस पुत्र दुर्लभ व इंद्रास तक्र दुर्लभ आहे.

यांति न्यायप्रवृत्तस्य तिर्यंचोपि सहायतां ॥
अपंथानं तु गच्छंतं सोदरोपि विमुंचति ॥ ९२

अर्थः- न्यायानें चालणारास पशुजातींतील प्राणीही साहा-

घ्याला प्राप्त होतात आणि असमार्गानें जाणारास सरवाभार दे खील सोडतो.

विद्याभ्यासो विचारश्च समयोरेव शोभते॥
विवाहश्च विवादश्च समयोरेव शोभते॥ ९३॥

अर्थः- विद्याभ्यास व विचार हे समानांचेच शोभतात आणि विवाह व विवाद हेही समानांचेच शोभतात.

वहेदमित्रं स्कंधेन यावत्कालविपर्ययः॥ अर्थे
वमागते काले भिंद्याद् घटमिवाश्मनि॥ ९४॥

अर्थः- जों पर्यंत काल प्रतिकूल आहे तों पर्यंत शत्रूला खांद्या वर धारण करावें. नंतर तोच काल अनुकूल झाला असतां मड क्याला दगडावर फोडल्या प्रमाणें त्या शत्रूला मारावा.

सर्वनाशे समुत्पन्ने ह्यर्धं त्यजति पंडितः॥ अ-
र्धेन कुरुते कार्यं सर्वनाशो न जायते॥ ९५॥

अर्थः- सर्व वस्तूचा नाश प्राप्त झाला असतां ज्ञानी त्यांतील अर्ध्या भागाचा त्याग करतो आणि अर्धभागानें स्वकार्य करतो असें केलें असतां सर्वनाश होत नाहीं.

अनुचितकर्मारंभः स्वजनविरोधो बलीयसि
स्पर्धा॥ प्रमदाजनविश्वासो मृत्युद्वाराणि
चत्वारि॥ ९६॥

अर्थः- अयोग्य कर्माविषयीं आरंभ, स्वजनाशीं विरोध, बला ढ्याविषयीं स्पर्धा व स्त्री जनावर विश्वास हीं चार मृत्युद्वारें आहेत.

सुलभाः पुरुषा राजन् सततं प्रियवादिनः॥ अ
प्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः॥ ९७

अर्थः- हे राजन् सतत प्रियभाषण करणारे पुरुष सुलभ आहे त परंतु अप्रिय असून हितकारक अशा भाषणाचा वक्ता व श्रो ता हे दोघेही दुर्लभ आहेत.

गतेश्रीर्गणकान् द्वेष्टि गतायुश्च चिकित्सकं॥

गतश्रीश्च गतायुश्च ब्राह्मणान् द्वेष्टि भारत ॥ ९८ ॥

अर्थः- धर्मराजा, ज्याची संपत्ति जाण्याच्या अवस्थेला प्राप्त झाली तो ज्योतिषि लोकांचा द्वेष करतो, ज्याचें आयुष्य संपत आलें तो वैद्याचा द्वेष करतो आणि ज्याची संपत्ति व आयुष्य ह्या दोहोंचाही नाशसमय आला तो ब्राह्मणांचा द्वेष करतो.

सुहृदि निरंतरचित्ते गुणवति भृत्ये प्रियासु नारीषु ॥ स्वामिनि शक्तिसमेते निवेद्य दुःखं जनः सुखी भवति ॥ ९९ ॥

अर्थः- निरंतर चित्त ठेवणारा मित्र, गुणवान् सेवक, स्त्रिया प्रिय व यजमान शक्तिमान् यांच्या जवळ दुःख निवेदन करून जन सुखी होतो.

अन्वयागतविद्यानामन्वयागतसंपदां ॥ विदुषां च प्रभूणां च हृदयं नावलिप्यते ॥ १०० ॥

अर्थः- वंशपरंपरागत विद्यासंपन्न विद्वान् व वंशपरंपरागत संपत्तियुक्त राजे यांचें अंतःकरण गर्वयुक्त होत नाहीं.

शोभंते विद्यया विप्राः क्षत्रिया विजयश्रिया ॥ श्रियोनुकूलदानेन लज्जया च कुलांगनाः ॥ १०१ ॥

अर्थः- ब्राह्मण विद्येनें शोभतात, विजयसंपत्तीनें क्षत्रिय शोभतात, योग्य दानानें संपत्ति शोभतात व कुलस्त्रिया लज्जेनें शोभतात.

गंतव्या राजसभा द्रष्टव्या राजवल्लभाः पुरुषाः ॥ यद्यपि न भवत्यर्थो भवत्यनर्थप्रतीकारः ॥ १०२ ॥

अर्थः- राजसभेंत जावें, राजप्रिय पुरुषांस भेटावें, त्या पासून कार्य जरी नझालें तरि अरिष्ट निवारण होतें.

प्रियवाक्यप्रदानेन सर्वे तुष्यंति जंतवः ॥ तस्मात्तदेव वक्तव्यं वचने का दरिद्रता ॥ १०३ ॥

अर्थः- सर्व प्राणी प्रियवाक्य भाषणानें संतुष्ट होतात यास्तव तेंच बोलावें वचनाविषयीं दरिद्रता कां करावी ?

विवाहकाले ऋतुसंप्रयोगे प्राणात्यये सर्वध-

नापहारे ॥ विप्रस्य चार्थेप्यनृतं वदेयुः पंचानृ-
तान्याहुरपातकानि ॥ १०४ ॥

अर्थः- लग्नकाळीं, ऋतूच्या शांतीविषयीं, प्राणनाशकाळीं, सर्व धनापहरणसमयीं, ब्राह्मणकार्य या ठिकाणीं असत्य भाषण करावें कारण तीं पांचही अनृतभाषणें पातकरहित आहेत असें म्हणतात.

धिग्गृहं गृहिणीशून्यं धिक्कलत्रमपुत्रकं ॥ धि
क्पुत्रमविनीतं च धिग्ज्योतिषमजातकं ॥ १०५

अर्थः- स्त्रीरहित गृहास धिक्कार असो, पुत्रहीन स्त्रीला धिक्कार असो, उद्धतपुत्रास धिक्कार असो व जातकरहित ज्योतिषास धिक्कार अ॰

हरिं हरीतकीं चैव गायत्रीं च दिने दिने ॥ मो-
क्षारोग्यतपःकामश्चिंतयेद्भक्षयेज्जपेत् ॥ १०६ ॥

अर्थः- मोक्ष, आरोग्य व तप यां विषयीं ज्यास इच्छा असेल त्यानें नित्यशः मोक्षार्थ हरिचिंतन करावें. आरोग्यार्थ हरीतकी ( हिरडे ) भक्षावी. तपश्चर्यार्थ गायत्रीजप करावा.

साधारणतरुबुद्ध्या नै मया बद्धं तेवालवा-
लादि ॥ लज्जयसि मामिदानीं चंपक भुवना
नि वासितैः कुसुमैः ॥ १०७ ॥

अर्थः- हे चंपका, सामान्य वृक्षबुद्धीमुळें मी तुला आळें आदि करून कांहींच केलें नाहीं परंतु तूं या काळीं आसमंतात्प्रदेशांस सुवासयुक्त करणाऱ्या अशा आपल्या पुष्पानीं मला लज्जित करीत आहेस.

मतिरेव बलाद्गरीयसी तदभावे करिणामियं
दशा ॥ इति घोषयतीव डिंडिमः करिणो ह-
स्तिपकाहतः क्वणन् ॥ १०८ ॥

अर्थः- बलापेक्षां बुद्धीच श्रेष्ठ आहे कारण बुद्धीचा अभाव असल्यामुळें गज बलिष्ठ असूनही त्यांस पराधीन कष्टदशा प्राप्त झाली आहे असें महातानें वाजविलेला नगारा शब्द करित होत्साता हत्तींस घोषद्वारें सांगतोच आहे काय.

गुणानामज्ञाता प्रचुरधनदाताऽपि न मुदे मुदे विद्याज्ञाता
भवति मितदाताऽपि गुणिनां॥ दृशौ ग्राम्या दत्ते न पुनरवदे
त्ते नु पुरुषं दृशाः कोणं दत्वा वशयति नितांतं पुरवधूः॥१०९

अर्थ:- गुणांचा ज्ञाता नसून बहुधनदाता असला तरी तो हर्षास कारण होत नाहीं; तर विद्येचा ज्ञाता असून अल्पधनदाता असला तरि तो गुणिजनांस हर्षास कारण होतो; यास दृष्टांत खेडेगांवांतील स्त्री दोन्हीं नेत्रांनीं पुरुषाकडे पाहते तरी ती त्यास आकर्षण करण्या विषयीं समर्थ होत नाहीं, आणि नागरिक स्त्री नेत्रकटाक्षावलोकनानें पुरुषास अत्यंत वश करिते.

द्रव्यं परिमितमधिकव्ययशीलिनं पुरुषमाकुलीकुरुते
अल्पांशुकमिव पीनस्तनजघनभराया मनः कुलीनायाः॥११०

अर्थ:- परिमितद्रव्य, अधिक खर्च करण्याच्या स्वभावयुक्त पुरुषास व्याकुल करतें. यास दृष्टांत पुष्टस्तन व कंबरे पुढील भाग या अवयवांच्या मोठेपणानें युक्त अशा कुलीनस्त्रीचे मनास लहान वस्त्र जसें व्याकुल करतें तद्वत.

अंतः स्नेहसमायुक्तान् बहिः शर्करया युतान्॥ तिलान्
स्वीकृत्य भो ब्रह्मन् सस्नेहं मधुरं वद॥१११॥

अर्थ:- अभ्यंतरीं स्नेहयुक्त असून बाहेर शर्करेनें युक्त असे तिळ घेऊन हे ब्राह्मणा स्नेहयुक्त व मधुर असें भाषण कर.

हस्तमाक्षिप्य यातोऽसि बलात् कृष्ण किमद्भुतम्॥ हृद
याद्यदि निर्यासि पौरुषं गणयामि ते॥११२॥

अर्थ:- हे कृष्णा बलानें हाताला हिसका देऊन गेलास यांत आश्चर्य काय? तर हृदयांतून जर निघून जाशील तर मात्र मी तुझा पराक्रम मान्य करीन.

तात साधु कृतं मौनं कोकिल प्रावृषि त्वया॥ वक्तारो
दर्दुरा यत्र तत्र मौनं सुभाषितं॥११३॥

अर्थ:- हे बाप्पा कोकिला तूं पर्जन्यकालीं मौन केलेंस हें उत्तम आहे; कारण ज्या कालांत वक्ते बेडूक आहेत त्या समयीं सुस्वर भाषणाचा काय उपयोग होईल?

तावन्मौनेन नीयंते कोकिलैरपि वासराः॥ यावत् सर्व-

जनानंददायिनी वाक् प्रवर्तते ॥११४॥

अर्थ:- कोकिलांस ज्या कालीं सर्व जनाल्हादकारक वाणी प्राप्त होते तोंप र्यंत ते ही मौनानें दिवस घालवितात.

अजापुच्छमिवव्यर्थं जीवितं स्वल्पविद्यया ॥ न गुह्यगो पने दक्षं न च दंशनिवारणे ॥११५॥

अर्थ:- अल्पविद्येनें उपजीवन करणें हें शेळीच्या पुच्छा प्रमाणें व्यर्थ जा णावें; कारण तें पुच्छ गुह्यस्थान झांकणें व मक्षिकादिक दंश करणाऱ्या प्राण्यांचें निवारण करण्या विषयीं समर्थ नाहीं.

प्रसिद्धिहेतुर्वस्तूनां प्रायः श्रेष्ठ परिग्रहः ॥ सहस्त्रं जल धौ शंखाः पांचजन्यस्तु विश्रुतः ॥ ११६॥

अर्थ:- श्रेष्ठानीं स्वीकार करणें हें प्रायः सर्व वस्तूंच्या प्रसिद्धीला कारण आहे या विषयीं उदाहरण, समुद्रांत सहस्त्रावधि शंख आहेत; परंतु पांचजन्य शं ख श्रीकृष्णानें अंगीकारिल्या मुळें प्रसिद्ध झाला.

भक्ते द्वेषो जडे प्रीतिरुचितं गुरुलंघनं ॥ मुखे कटुकता नित्यं धनिनां ज्वरिणामिव ॥११७॥

अर्थ:- भक्ता (भात किंवा सेवक) वर द्वेष, जडा (जल अथवा मूर्ख) वर प्रीति गुरुलंघन (मोठें लंघन किंवा मातापितरादिक पूज्य वर्गाची अमर्यादा) कर णें उचित, मुखस्थानीं निरंतर कटुकता (तीक्ष्ण भाषण अथवा कडूपणा) हे गुण धनिक लोकांस ज्वरित लोकांसमान असतात.

जिव्हे प्रमाणं जानीहि भक्षणे भाषणेपिच ॥ अतिभु क्तिरतीवोक्तिः सद्यः प्राणापहारिणी ॥११८॥

अर्थ:- हे जिव्हे भक्षण व भाषण यां विषयीं परिमितपणा असावा असें जाण; कारण अतिभक्षण व अतिवाचित भाषण हीं दोन्ही तत्काल प्राण ह रण करणारीं आहेत.

दानं वित्तात् ऋतं वाचः कीर्तिज्ञाने तथायुषः ॥ परोप करणं कायादसारात्सार मुद्धरेत् ॥११९॥

अर्थ:- द्रव्यापासून दान, वाणीपासून सत्य, तशींच आयुष्या पासून कीर्ति वज्ञान, देहापासून परोपकार अशा रीतीनें नश्वर पदार्थांपासून शाश्वत

संपादन करावें.

सीतानिश्वासवातेन रामकोपानलेन ते॥ दग्ध पूर्वैव सा लं-
का निमित्तमभवत्कपिः॥१२०॥

अर्थः- हे रावणा, सीतेच्या श्वासवायूनें आणि रामाच्या क्रोधाग्नीनें तुझी ती लंका पूर्वी दग्ध झालेलीच होती यावरून त्या विषयीं मारुति निमित्त मात्र झाला असें सिद्ध होतें.

असाधुः साधुर्वा भवति खलु जात्यैव पुरुषो न संगोद्दोर्ज-
न्यं नहि सुजनता कस्यचिदपि॥ प्ररूढे संसर्गे मणिभुज
गयोर्जन्मजनिते मणिर्नोहि दोषान् स्पृशति न हि सर्पो म-
णिगुणान्१२१

अर्थः- असाधु किंवा साधु असा पुरुष निश्चयें करून आपल्या स्वभावानें-च होतो आणि कोणासही समागमानें दुर्जनत्व येत नाहीं व सुजनत्वही होत नाहीं. यास दृष्टांत मणि व सर्प यांचा समागम जन्मापासून बहुतकाल असून मणि सर्पाच्या दोषांस स्पर्श करीत नाहीं व सर्प मण्याच्या गुणांस ग्रहण करीत नाहीं.

वनेपि सिंहा मृगमांसभक्षिणो बुभुक्षिता नैव तृणं चरं-
ति॥ एवं कुलीना व्यसनाभिभूता न नीचकर्माणि समाचरं-
ति॥१२२

अर्थः- वनांत मृगमांस भक्षण करणारे सिंह क्षुधाक्रांत झाले तरी तृण भक्षण करीत नाहींत. या प्रमाणेंच कुलीन पुरुष संकटानें व्यास झाले तरी नीच कर्में करीत नाहींत.

कांताकटाक्षविशिखा न लुनंति यस्य चित्तं न निर्दहति
कोपकृशानुतापः॥ कर्षंति भूरिविषयांश्च न लोभपाशा
लोकत्रयं जयति कृत्स्नमिदं सधीरः॥१२३॥

अर्थः- स्त्रियांचे कटाक्षबाण ज्याच्या चित्तास वेध करीत नाहींत, आणि क्रोधाग्नीची तमता ज्यास व्यथा देत नाहीं, व लोभपाश बहुत विषयांस आकर्षण करीत नाहींत असा जो धीर पुरुष तो या संपूर्ण लोकत्रयास जिंकितो.

दुर्जनदूषितमनसां पुंसां सुजनेप्यविश्वासः॥ बालः पा-

यसदग्धो दध्यपिं फूत्कृत्य भक्षयति॥१२४॥

अर्थः- दुर्जनसंगानें दूषित मनयुक्त झालेल्या पुरुषास सज्जनावरही विश्वास वाटत नाहीं. यास दृष्टांत. बालक पायसानें (क्षीर) पोळला असतां तो दहीं देखील ऊन असेल अशा शंकेनें फुंकून भक्षितो.

अकरुणत्व मकारणविग्रहः परधने परयोषितिच स्पृहा॥
सुजन बंधुजनेष्वसहिष्णुता प्रकृतिसिद्धमिदं हि दुरात्मनां॥१२५॥

अर्थः- निर्दयत्व, निष्कारण कलह, परधन व परस्त्री यां विषयीं इच्छा, सज्जन व बांधव यांचा उत्कर्ष सहन न होणें हें दुर्जनांचें स्वभावसिद्ध असतें

जाड्यं ह्रीमति गण्यते व्रतरुचौ दंभः शुचौ कैतवं॥ शूरे निर्घृणता मुनौ विमतिता दैन्यं प्रिया लापिनि॥ तेजस्विन्यवलिप्तता मुखरता वक्तर्यशक्तिः स्थिरे॥ तत्को नाम गुणो भवेत् सुगुणिनां यो दुर्जनैर्नांकितः॥१२६॥

अर्थः- लज्जायुक्त पुरुषाच्या ठिकाणीं मूर्खत्व, व्रतें करण्याच्या अभिरुचिवंत मनुष्याच्या ठिकाणीं दंभ, पवित्र जनावर कपट, शूराविषयीं निर्दयत्व, मननशीला विषयीं बुद्धिहीनता, प्रिय भाषण करणारावर दीनता, तेजस्वी पुरुषाच्या ठिकाणीं गर्विष्ठपणा, वक्त्यावर वाचालत्व व स्थिर मनुष्यावर अशक्तत्व, असे प्रत्येक गुणावर दोष स्थापन करतात. अशा गुणांवर दोषारोप करण्याच्या रीतीनें दुर्जनानीं दोषारोप न केला असा जो उत्तम गुणिजनांचा गुण तो कोणता प्रसिद्ध आहे तर एकही नाहीं.

आस्तां तावदहो समुद्रमहिमा दूरेपि कर्णप्रियस्तीरे यस्य पिपासयैव मरणं प्राप्नोति शीघ्रं जनः॥ तस्मादंबुनिधेर्वरं लघुसरः कूपोथवा वापिका यत्र स्वात्मकरद्वयेन सलिलं पेपीयते स्वेच्छया॥१२७॥

अर्थः- आश्चर्यकारक दुरूनच कर्णांस प्रिय असा समुद्रमहिमा असो; कारण ज्याच्या तीरीं लोक तृषेनेंच शीघ्र मरण पावतात, यास्तव लहान सरोवर, आड अथवा विहीर हींच समुद्रापेक्षां बरीं; कारण त्यांचे ठिकाणीं जन आपल्या दोन्ही हातानीं स्वेच्छेनें उदक प्राशन करितो.

निःसारस्य पदार्थस्य प्रायेणाडंबरो महान्॥ न सुवर्णे ध्व-

निस्ताद्दक् याद्दक् कांस्यं प्रजायते॥१२८॥

अर्थः- निःसार पदार्थाच्या अंगीं प्रायः खटाटोप मोठा असतो. यास दृष्टांत कांस्याच्या ठिकाणीं जसा ध्वनि होतो तसा सुवर्णाच्या ठिकाणीं होतनाहीं.

आकर्ण्य भूपाल यशस्त्वदीयं विधूनयंतीह न के शिरांसि॥ विश्वंभराभंगभयेन धात्रा नोकारि कर्णौ भुजंगेश्वरस्य १२९

अर्थः- हे राजा तुझें यश ऐकून या विषयीं कोण माना डोलविणार नाहींत. याच कारणा वरून पृथ्वीचा भंग होईल या भयास्तव ब्रह्मदेवानें शेषास कर्णेंद्रिय केलें नाहीं.

अगाधहृदयाभूपाः कूपा इव दुरासदाः॥ घटका गुणिनो नोचेत् कथं लभ्येत जीवनम्॥१३०॥

अर्थः- आयासानीं प्राप्त होण्यास अशक्य असे राजे, कूपासारखे खोल अंतःकरणाचे असतात; यास्तव तेथें गुणिजन घटक नसतील तर जीवन (उदक व उपजीविका) कसें प्राप्त होईल?

कलारत्नं गीतं गगनतलरत्नं दिनमणिः॥ सभारत्नं विद्वान् श्रवणपटुरत्नं हरिकथा निशा रत्नंचंद्रः शयनतलरत्नं शशिमुखी॥ महीरत्नं श्रीमान् जयति रघुनाथो नृपवरः॥१३१॥

अर्थः- सर्व कलांत गायन श्रेष्ठ असून सूर्य आकाशांत रत्न, सभारत्न विद्वान्, कर्णांतील उत्तम रत्न हरिकथा, रात्रिसमयीं चंद्ररत्न, शय्येवरील रत्न चंद्रमुखी स्त्री व पृथ्वीवरील रत्न राजाधिराज श्रीमान् रामचंद्र सर्वोत्कर्षानें वर्ततो.

व्यालाश्रितोपि विफलोपि सकंटकोपि वक्रोपि पंकजनितोपि दुरासदोपि॥ गंधेन बंधुरसि केतक पुष्पजंतस्त्वेकोगुणः खलु निहंति समस्त दोषान्॥१३२॥

अर्थः- हे केवड्या, तूं सर्पांस आश्रय देणारा, फलरहित, कांट्यानीं युक्त, आकृतीनें वांकडा, कर्दमांत उत्पन्न झालेला, लोकांस प्रयासानें प्राप्त होणारा असा असूनही पुष्पसंबंधि सुगंधामुळें सर्वांस प्रिय आहेस. यावरून

असें सिद्ध होतें कीं, एक गुण सर्व दोषांस निश्चयें करून आच्छादित करतो

छायां प्रकुर्वंति नमंति पुष्पैः फलानि यच्छंति तटद्रुमा ये
उन्मूल्य तानेव नदी प्रयाति तरंगिणां किं प्रतिपन्नमस्ति ॥१३३

अर्थः- छाया करितात, पुष्पानीं नम्र होतात. फळें देतात, असे जे तीरचे वृक्ष त्यांसच उखळून नदी वाहते. या वरून लाटा सारख्या चंचलस्वभाव युक्तांस अंगीकारिलेली वस्तु काय आहे तर एकही नाहीं.

कतिपयदिवसस्थायी पूरो दूरोन्नतोपि भविता ते ॥ तटि-
नि तटद्रुमपातन पातकमेकं चिरस्थायि ॥१३४॥

अर्थः- हे नदी, तुझा पूर दुरून उंच दिसणारा जरी आहे तरी कांहीं दिव राहणारा आहे. आणि या पुराच्या योगानें तीरावरील वृक्षांस पाडण्या एक पातक मात्र बहुकाल राहणारें आहे.

तटिनि चिराय विचारय विंध्यभुवस्तव पवित्रायाः ॥ शु
ष्यंत्या अपि युक्तं किं खलु रथ्योदकादानम् ॥१३५॥ छ

अर्थः- हे नदी, बहुकाल असा विचार कर कीं, तूं विंध्यपर्वता पासून उत्प न्न झालेली पवित्र असून शुष्क झालीस तरी गल्लींतील अपवित्र उदक घेणें हें तुला निश्चयें करून योग्य आहे काय?

इयत्यां संपत्तावपि च सलिलानां त्वमधुना न तृष्णामार्ता-
नां हरसि यदि कासार सहसा ॥ निदाघे चंडांशौ किरति प-
रितोंगारनिकरं कृशीभूतः केषामहह परिहर्तासि खलु तां ॥१३

अर्थः- हे सरोवरा, तुझ्या ठिकाणीं उदकाची इतकी संपत्ति असूनही या कालीं तृषार्त लोकांची तृषा तत्काल जर हरण करणार नाहींस तर उष्णकालीं सूर्य आपल्या किरणांतून आसमंतात् उष्णसमुदायाची वृष्टि करीत असतां कृश झालास म्हणजे कोणाच्या तृषेला निश्चयें करून हरण करणारा होशील?

परसम्यक्‌कृता लोके नासमानसमानना ॥ इतीव कुमुदोद्भेदे
कमलेस्त्वकुलायितम् १३७

अर्थः- लोकांत संपत्तिहीनता श्रेष्ठ; परंतु योग्यतेनें जे हीन त्यांशीं बरो- बर युक्त नाहीं, अशा आशयानेंच काय रात्रिविकासि कमलांच्या प्रफु

होण्याचे समयीं सूर्यविकासि कमलें मिटलीं.

अतिमलिने कर्तव्ये भवति खलानामतीव निपुणा धीः
तिमिरे हि कौशिकानां रूपं प्रतिपद्यते दृष्टिः ॥१३८॥ ७

अर्थः- अत्यंत दोषयुक्त कार्य करण्या विषयीं दुर्जनांची बुद्धि अतिशायें पूर्ण प्रवृत्त होते. यास दृष्टांत घुबडांची दृष्टि जशी अंधकारांत रूपास अवलोकन करते तद्वत्.

परवादे दशवदनः पररंध्रनिरीक्षणे सहस्राक्षः ॥ सद्वृत्तवित्तहरणे बाहुसहस्रार्जुनो नीचः ॥१३९॥

अर्थः- दुर्जन परनिंदे विषयीं दशमुख असून दुसऱ्याचें छिद्र पाहण्या विषयीं सहस्रनेत्र होतो. आणि सज्जनांचें द्रव्य हरण करण्या विषयीं सहस्रार्जुनासारखा सहस्रकर होतो.

विशिखव्यालयोरंत्यः वर्णाभ्यां यो विनिर्मितः ॥ परस्य हरति प्राणान् नैतच्चित्रं कुलोचितम् ॥ १४० ॥

अर्थः- विशिख (बाण) आणि व्याल (सर्प) यांच्या अंत्य अक्षरानीं जो खल (दुर्जन) निर्माण केला तो दुसऱ्याचे प्राण हरण करतो, हें आश्चर्य नाहीं; कारण तें कर्म त्याच्या कुलास उचित आहे.

पादाहतोपि दृढदंडसमाहतोपि यदंष्ट्रया स्पृशति तं किल हंति सर्पः ॥ हर्षादिदेव पिशुनोत्र मनुष्यधर्मा कर्णे परं स्पृशति हंत्यपरस्य मूलं १४१

अर्थः- पायानें ताडितही झालेला, किंवा बळकट दंडानें ताडनही केलेला सर्प आपल्या दाढेनें ज्यास दंश करितो त्यासच मारतो. आणि या लोकीं दुर्जन, मनुष्यधर्मानें युक्त असून तो हर्षानेंच काय दुसऱ्याच्या कानास लागतो व इतरांचा मूल नाश करतो.

यस्मिन्वंशे समुत्पन्नस्तमेव निजचेष्टितैः ॥ दूषयत्यचिरेणैव घुणकीट इवा धमः ॥ १४२ ॥

अर्थः- घुणकीट (वाळवीचे किडे) ज्या वेळूंत उत्पन्न होतात ते आपल्या कृत्यानीं त्या वेळूसच शीघ्र नाशास जसे पाववितात तसा दुर्जन ज्या कुलांत उत्पन्न झाला त्या वंशासच त्वरित स्वकर्मानीं दूषित करितो.

स्वभावकठिनस्यास्य कृत्रिमां बिभ्रतो नतिम्॥ गुणोपि प-
रहिंसायै चापस्य च खलस्य च ॥१४३॥

अर्थ:- जसें हें धनुष्य स्वभावतः कठिन असून कृत्रीनें नम्रता धारण करितें; परंतु त्याची दोरी ही दुसऱ्याच्या हिंसेला कारण आहे तसा हा दुर्जन स्वभावानें क्रूर असून तो कपटानें नम्रता धारण केलेली दाखवितो तरी त्याचा गुणही दुसऱ्याच्या नाशास कारण असतो.

अयःपिंड इवोत्तप्ते खलानां हृदये क्षणात्॥ पतिता एव
नश्यंति गुणास्तोयकणा इव ॥१४४॥

अर्थ:- अतितप्त लोहगोलकासमान दुर्जनाच्या अंतःकरणांत गुण पडतांच ते अत्यंत तप्तलोहगोलकावर पडलेल्या उदक कणा सारखे नाश पावतात.

स्तोकेनोन्नतिमायाति स्तोकेनायात्यधोगतिम्॥ अहो तु-
सदृशी वृत्तिस्तुलायष्टेः खलस्यच ॥१४५॥

अर्थ:- अल्पानें उंचाला येतो व अल्पानें खालीं जातो अशी तागडीच्या दांडीची व दुर्जनाची वृत्ति समानच असते हें आश्चर्य आहे.

पात्रमपात्री कुरुते दहति गुणं स्नेहमाशु नाशयति॥ अ-
मले मलं नियच्छति दीपज्वालेव खलमैत्री ॥१४६॥ छ.

अर्थ:- दुर्जनाशीं केलेली मैत्री दीपाच्या ज्वाले सारखी आहे; ती अशी-कीं, दीपज्वाला आपल्या आधारभूत पात्रास अयोग्य करते. दुर्जन मैत्री योग्यास अयोग्य करते. दीपज्वाला गुणास (सूत्र) दग्ध करिते व खलमैत्री विनयादि गुणांचा नाश करिते. दीपज्वाला घृत व तैल इत्यादिकांचा त्वरित नाश करिते. आणि खलमैत्री प्रीतीचा नाश शीघ्र करिते. दीपज्वाला निर्मलास मलिन करिते. दुर्जनमैत्री निर्दोष मनुष्यास दोषयुक्त करते

दुर्वृत्तसंगतिरनर्थपरंपराया हेतुः सतां भवति किं वचनी-
यमेतत्॥ लंकेश्वरो हरति दाशरथेः कलत्रं प्राप्नोति बंध-
मथ दक्षिणसिंधुराजः ॥१४७॥

अर्थ:- दुर्जनसंगति सज्जनांस दुःखपरंपरेच्या प्राप्तीला कारण होते हें काय सांगावें? याचें उदाहरण असें कीं, रावणानें रामचंद्राची स्त्री हरण केली

नंतर त्याच्या संगतिसंबंधामुळें दक्षिणसमुद्रास सेतुबंधन प्राप्त झालें. ॥ १४७ ॥

करोति स्वमुखेनैव बहुधान्यस्य खंडनम् ॥ नमः पतनशी-
लाय मुसलाय खलायच ॥ १४८ ॥

अर्थः– स्वमुखानेंच बहुधान्याचें चूर्ण करणारें आणि स्वमुखानेंच बहुत प्रकारें इतरांचें खंडन करणारा असून वारंवार खालीं पडणार अशा मुसळास व खळास नमस्कार असो.

न देवाय न धर्माय न सिंधुभ्यो नचार्थिने ॥ दुर्जनास्यार्जि-
तं वित्तं भुज्यते राजतस्करैः १४९

अर्थः– दुर्जनानें संपादन केलेलें द्रव्य देवास नाहीं, धर्मास नाहीं, नद्यांस नाहीं, याचकांस नाहीं, तर राजे व चोर हे त्या धनाचा उपभोग करितात.

मुखं पद्मदलाकारं वाचा चंदनशीतला ॥ हृदयं क्रोधसं-
युक्तं त्रिविधं धूर्तलक्षणम् ॥ १५० ॥

अर्थः– कमलदलाकृति मुख, चंदनासारखी शीतल वाणी व अंतःकरण क्रोधयुक्त असें तीन प्रकारचें दुर्जनाचें लक्षण असतें.

शारदोत्पलसंकाशं वक्त्रं वचश्च श्रवणामृतम् ॥ हृदयं क्षुरधा-
रासं स्त्रीणां को वेद चेष्टितम् ॥ १५१ ॥

अर्थः– स्त्रियांचें मुख शरदृतूंतील कमळा सारखें प्रफुल्लित, भाषण अमृततुल्य मधुर, व अंतःकरण वस्तऱ्याच्या धारेसमान तीक्ष्ण अशा स्त्रियांचें कृत्य कोण जाणील !!

संपदो महतामेव महतामेव चापदः ॥ वर्धते क्षीयते चं-
द्रो नतु तारागणः क्वचित् ॥ १५२ ॥

अर्थः– श्रेष्ठांसच संपत्ति प्राप्त होतात, आणि थोरांसच विपत्ति प्राप्त होतात; याचा अनुभव असा कीं,– चंद्र कलावृद्धि व कलाक्षय यांस पावतो. परंतु नक्षत्रगण कदापि वृद्धिक्षयांस प्राप्त होत नाहीं.

किं जन्मनाच महता पितृपौरुषेण शक्त्याहि याति निज-
या पुरुषः प्रतिष्ठां ॥ कुंभा न कूपमपि शोषयितुं सम-
र्थाः कुंभोद्भवेन मुनिनांबुधिरेव पीतः ॥ १५३ ॥

अर्थः– मोठ्या पितृपराक्रमावर जें जन्म त्यानें काय उपयोग? तर पुरुष स्व-

शक्तीनें प्रतिष्ठा पावती. याचें उदाहरण:- कुंभ कूपालाही शोषण्या विषयीं स-
मर्थ नसून कुंभापासून जन्मलेल्या अगस्त्यमुनीनें तर समुद्रच प्राशन केला.

महतां सद्व्ययेनैव विपत्तिरपि शोभते ॥ दंतभंगोहि ना-
गानां श्लाघ्यो गिरिविदारणे ॥ १५४ ॥

अर्थ:- महात्म्यांस उत्तम व्ययानेंच प्राप्त झालेली विपत्तीही शोभते; यास दृ-
ष्टांत:- पर्वत फोडण्याच्या कारणानें झालेला गजाचा दंतभंग स्तुत्य होतें.

ऐश्वर्यस्य विभूषणं सुजनता शौर्यस्य वाक्संयमो ज्ञा-
नस्योपशमः कुलस्य विनयो वित्तस्य पात्रे व्ययः ॥ अ-
क्रोधस्तपसः क्षमा बलवतां धर्मस्य निर्व्याजता सर्वेषा-
मपि सर्वकारणमिदं शीलं परं भूषणम् ॥ १५५ ॥ ७

अर्थ:- ऐश्वर्यास भूषण सौजन्य, शौर्यास भूषण वाणीचें नियमन, ज्ञाना-
चें भूषण शांति, कुलास भूषण विनय, द्रव्यास भूषण सत्पात्रीं दान कर-
णें, तपाचें भूषण क्रोध नसणें, बलवंतास भूषण क्षमा करणें, धर्माचें भूष-
ण निष्कपटता आणि सर्वांसही सर्व प्रकारें कारण असून उत्तम भूषण
असें हें शील आहे.

माता निंदति नाभिनंदति पिता भ्राता न संभाषते भृ-
त्यः कुप्यति नानुगच्छति सुतः कांता च नालिंगते ॥
अर्थप्रार्थनशंकया न कुरुते संभाषणं वै सुहृत् त-
स्माद्द्रव्य मुपार्जयस्व शृणु सखे द्रव्येण सर्वे वशाः १५६

अर्थ:- माता निंदा करित्ये, पिता संतोष पावत नाहीं, बंधु चांगलें भाषण क-
रीत नाहीं. सेवक क्रुद्ध होतो, पुत्र आज्ञेंन वर्तत नाहीं, भार्या आलिंगन क-
रीत नाहीं, कांहीं द्रव्य मागेल या शंकेनें मित्रही संभाषण करीत नाहीं, या
स्तव हे मित्रा, द्रव्यसंपादन करावें त्याचें फल ऐक कीं, द्रव्यानें मातापितरादि-
क सर्व वश होतात.

भो रोहिणि त्वमसि रात्रिचरस्य भार्या एनं निवारय पतिं
सखि दुर्निवारं ॥ जालांतरेण मम सद्मनि संनिविष्टः श्रो-
णीतटं स्पृशति किं कुलधर्म एषः ॥ १५७ ॥

अर्थ:- हे रोहिणि, तूं रात्रीं संचार करणाऱ्या चंद्राची भार्या आहेस, यास्तव

हे सखि, या अनिवार पतीचें निवारण कर; कारण हा जाळीच्या मध्य छिद्रां-तून गृहांत प्रविष्ट होऊन माझ्या कटिप्रदेशास स्पर्श करितो हा याचा कुलधर्म आहे काय?

क्षणं सरलवीक्षणं क्षणमपांगसंवीक्षणम् क्षणं रजसि खेलनं क्षणमतीव भूषादरः॥ क्षणं द्रुततरा गतिः क्षणमतीव मंदा गतिः क्षणक्षण विलक्षणं जयति चेष्टितं सुभ्रुवः॥१५८॥

अर्थ:- क्षणमात्र समोर पाहणें, क्षणभर नेत्रकटाक्षांनीं पाहणें, क्षणभर रजांत खेळणें, क्षणमात्र अत्यंत भूषणें धारण करण्या विषयीं उत्सुकता, क्षणभर अति त्वरित गमन, क्षणमात्र अतिशयित मंद गमन अशी सुंदर भृकुटी शोभित सुंदर स्त्रीची लीला प्रतिक्षणीं विलक्षणत्वें करून सर्वोत्कर्षानें शोभते.

भो पांथ त्वरितोसि तिष्ठ निमिषं किंचिद्वदामो वयम् मार्गोयं पुरतो द्विधा खलु भवेत् वामेन नो गम्यतां तत्रास्ते सहकारकोमलतरोर्मूले प्रपापालिका तस्या लोचनवागुरा निपतितो न त्वं पुनर्यास्यसि॥१५९॥

अर्थ:- हे मार्गस्था, त्वरेनें जात आहेस; परंतु निमेषमात्र उभा रहा; कारण आह्मीं कांहीं सांगतों तें असें कीं, हा मार्ग पुढें दोहींकडे निश्चयें करून फुटणार आहे, त्यांतील डाव्या हाताकडील मार्गानें जाऊं नको; कारण त्या मार्गातील कोमल आम्रवृक्षाच्या मूलावर पाणपोईचें रक्षण करणारी कोणी एक सुंदर स्त्री आहे तिच्या नेत्रकटाक्ष जाळ्यांत सांपडलास ह्मणजे तूं पुनः माघारा येणार नाहींस.

कस्तूरिकां तृणभुजामटवीचराणां निक्षिप्य नाभिषु वृथा कुरुते वधार्हान्॥ मूढो विधिः सकलदुर्जनलोलजिव्हामूलेषु निक्षिपति चेत् स कलोपकारः॥१६०॥

अर्थ:- ब्रह्मदेव अरण्यांत संचार करून तृण भक्षण करणाऱ्या हरिणांच्या नाभिस्थानीं कस्तूरिची उत्पत्ति निर्माण करून त्यांस व्यर्थ वधयोग्य करतो. तस्मात् हा त्याचा अविवेक आहे; तर तो सर्व दुर्जनांच्या चंचल जिव्हांचे मूल-

स्थानीं जर कस्तुरीची उत्पत्ति निर्माण करता तर सर्वांवर उपकार झाला अस०

गंगां च धारयति मूर्ध्नि सदा कपाली सा तस्य चुंबति मुखं न कदाचिदेव॥ रत्नाकरं परिचुचुंब सहस्त्रवक्त्रैः गंगादयो युवतयः सधनानुकूलाः ॥१६१॥

अर्थः– कपालमालाधारी शिव स्वमस्तकीं गंगेला सर्वदा धारण करितो तरी ती त्याचें मुख चुंबन कधींच करीत नाहीं. आणि ती रत्नांच्या उत्पत्ति स्थानभूत समुद्रास सहस्त्रमुखानीं चुंबन करित्ये. तस्मात् गंगादिक तरुण स्त्रिया सधनास अनुकूल असतात.

अहो कनकमाहात्म्यं वक्तुं केनापि शक्यते॥ नामसाम्यादहो चित्रं धत्तूरोपि मदप्रदः॥१६२॥

अर्थः– आश्चर्यकारक कनकाचें (सुवर्णाचें) माहात्म्य कोणाच्यानेंही बोलण्यास शक्य नाहीं; कारण कनकाच्या केवल नाममात्र साम्यानेंही धोतऱ्याचा वृक्ष मनुष्यांस उन्मादरायक झाला हें अद्भुत आश्चर्य आहे.

अनुकुरुतः खलसुजना वग्रिमपाश्चात्य भागयोः सूच्याः॥ विदधाति रंध्रमेको गुणवानन्यस्तु पिदधाति १६३

अर्थः– दुर्जन व सुजन हे सुईचें अग्रभाग व मागला भाग यां सारखी निरनिराळी कृति करतात; ती अशी कीं, अग्रासमान दुर्जन छिद्र करितो आणि अन्य सज्जन तर मागील भागा सारखा गुण (सूत व गुण) वान् असल्या मुळें तो तें छिद्र आच्छादित करतो.

केनांजितानि नयनानि मृगांगनानां कोवा करोति रुचिरांगरुहान् मयूरान्॥ कश्चोत्पलेषु दलसन्निचयं करोति कोवा करोति विनयं कुलजेषु पुंसु ॥१६४॥ ६

अर्थः– हरिणींचे नेत्र स्वभावसिद्धच काजळयुक्त कोणी केले? आणि मोरांस सुंदर चित्रविचित्र पंखानीं युक्त कोण करतो? तसाच कमलांच्या ठिकाणीं पाकळ्यांच्या उत्तम समुदायाची रचना कोण करतो? व कुलीन पुरुषांच्या अंगीं विनय कोण स्थापन करतो? तर हें सर्व कृत्य (क) या नामानें प्रसिद्ध जो ब्रह्मदेव त्याचें आहे असें समजावें.

मंदरेण मथितोसि न पापिन् ग्रासितोसि तमसा न दुरा-

त्वम् ॥ त्वां शरेण शतधा परिभिन्द्ये जानकी मुखसमो यदि नस्याः ॥१६५॥

**अर्थः-** सीतावियोगानें युक्त झालेले रामचंद्र, चंद्रदर्शनानें अधिक व्यथा पावले असतां त्यास ह्मणतात कीं:- हे पापिन्, तुझें मंदराचलानें मंथन कां केलें नाहीं ! तसेंच हे दुष्टा, तुला राहूनें कसें ग्रासिलें नाहीं ! परंतु तूं जर जानकीच्या मुखा सारखा नसतास तर मी बाणानें तुला शतधा खंडित केलें असतें.

विदितं ननु कंदुक ते हृदयं प्रमदाधरसंगमलुब्ध इव
प्रमदाकरतामरसाभिहतः पतितः पतितः पुनरुत्पतसि ॥१६६॥

**अर्थः-** हे कंदुका, (चेंडू) तुझें अंतःकरण मी निश्चयें करून जाणलें. तें असें कीं, तूं सुंदरीच्या हस्तकमलानें ताडित होऊन वारंवार खालीं पडलास तरी सुंदर स्त्रीच्या अधरोष्ठ चुंबना विषयीं लुब्ध पुरुषासारखा पुनःपुनः उंच उडतोस!!

शैले शैले न माणिक्यं मौक्तिकं न गजे गजे ॥ साधवो न
हि सर्वत्र चंदनं न वने वने ॥१६७॥

**अर्थः-** माणीक प्रत्येक पर्वतावर नाहीं, मौक्तिक प्रतिगजाच्या गंडस्थळाचे ठिकाणीं नाहीं, तसेंच साधु सर्वत्र नाहींत, व चंदनही सर्व वनांत नसतें.

सज्जनस्य हृदयं नवनीतं यद्वदंति कवयस्तदलीकं ॥
अन्यदीयविलसत्परितापात् सज्जनो द्रवति नो नवनी-
तम् ॥१६८॥

**अर्थः-** सज्जनाचें अंतःकरण नवनीता (लोण्या) सारखें असें जें कवि ह्मणतात तें असत्य आहे; कारण इतरांच्या अतितीक्ष्ण दुःखानें सज्जन अंतःकरणांत द्रवतो; परंतु नवनीत द्रवत नाहीं.

कृतांतः कांतो वा समजनि न भेदः प्रथमतः ततो द्वित्रै-
र्मासैर्मनुज इति जथाह हृदयं ॥ ततो सौ मत्प्रेयानह-
मपि तदीया प्रियतमा क्रमाहर्षे प्राप्ते प्रियतममयं-
जातमखिलं १६९

**अर्थः-** कोणी एक स्त्री ह्मणते कीं:- पतीच्या प्रथमसंगप्रसंगीं हा यम आहे किं

वा पति आहे असा भेद मला समजला नाहीं, नंतर दोन तीन महिन्यानीं हा मनुष्य आहे असें माझ्या मनानें ग्रहण केलें. नंतर हा माझा अतिप्रियकर पति व मीही त्याची अत्यंत प्रियस्त्री असें वाटलें. पुढें क्रमानें वर्ष झालें असतां सर्व तो पतीच अतिप्रियत्वें करून माझ्या मनांत येऊं लागला.

कस्य त्वं तरुणि क्व ते गृहपतिः किं ब्रूहि मे वारणं विप्रोहं
मदविह्वलेन मनसा याचे दृढालिंगनम्॥ निंद्या हं रज-
की प्रिये नेहि नेहि त्वज्ज्ञातिरत्युत्तमा युष्माकं करनीर-
संगमवशात् वासो मलं मुंचति १७० ॥

अर्थ:– हे तरुणि, तूं कोणाची? तुझा गृहस्वामी कोठें आहे? आणि माझा निषेध कां करितेस तें सांग! मी ब्राह्मण असून माझें मन मदनानें व्याकुल झाल्यामुळें मी तुला दृढ आलिंगनाची याचना करतों; तेव्हां ती ह्मणते मी रजकी (परटीण) असल्यामुळें जातीनें निंद्य आहें. तेव्हां ब्राह्मण ह्मणतो हे प्रिये असें नाहीं नाहीं, तर तुझी जाति अति उत्तम आहे; कारण तुमचा हस्त व उदक यांचा संगम होतांच वस्त्र अचेतन असून तें मलाचा त्याग करितें; तस्मात् तुझा अंगसंग मला झाला असतां माझें पाप क्षालन होईलच.

न वै ताडनात्तापनाद्वन्हिमध्ये न वै विक्रयात् क्लिश्यमानो-
हमस्मि॥ सुवर्णस्य मे मुख्य दुःखं तदेकं यतो मां जना-
गुंजया तोलयंति ॥ १७१॥

अर्थ:– अग्नींत तापविल्यानें व ताडनानें मला दुःख नाहीं तसेंच विकण्यानें मला क्लेश होत नाहींत; तर लोक मला गुंजेनें जें तोलतात तें मला सुवर्णास एक मुख्य दुःख आहे.

सत्संगाद्भवति हि साधुता खलानां साधूनां नहि खलसं-
गमात् खलत्वं ॥ आमोदं कुसुमसमं मृदेव धत्ते मृद्गंधं
नहि कुसुमानि धारयंति ॥१७२॥

अर्थ:– सत्संगानें दुर्जनास साधुत्व प्राप्त होतें; परंतु साधूंस दुर्जनसंगतीनें दुष्टता प्राप्त होत नाहीं. याचा अनुभव असा कीं, मृत्तिकाच पुष्पांच्या संगानें सुगंध धारण करिते; परंतु पुष्पें त्या मृत्तिकेच्या वासाला धारण करीत नाहींत. ७,

भावेन देवं कलया नरेंद्रं धनेन कांतां कपटेन शत्रुम्॥

सत्येन मित्रं कृपया च पुत्रं ज्ञानेन मोक्षं वशमानयंति ॥१७३॥

अर्थ:- भक्तीनें देवास, कलेनें राजास, धनानें स्त्रीस, कपटानें शत्रूस, सत्यानें मित्रास, कृपेनें पुत्रास, व ज्ञानानें मोक्षास असें एका साधनानें एक विषयास स्वाधीन करतात.

लालयेत् पंच वर्षाणि दश वर्षाणि ताडयेत् ॥ प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रं मित्रवदाचरेत् ॥१७४॥

अर्थ:- जन्मा पासून पांच वर्षे पर्यंत लाड करावे, पुढें दहा वर्षे ताडन करावें आणि सोळावें वर्ष लागलें असतां पुत्राशीं मित्रा सारखें वर्तावें.

अप्रजां दशमे वर्षे स्त्रीप्रजां द्वादशे त्यजेत् ॥ मृतप्रजां पंचदशे सद्यस्त्वप्रियवादिनीम् ॥१७५॥

अर्थ:- ज्या स्त्रीस अपत्य होत नाहीं तिला दहाव्या वर्षी टाकावें, जिला कन्याच होतात तिला बाराव्या वर्षी टाकावें, आणि जिचीं अपत्यें मरण पावतात तिला पंधराव्या वर्षी टाकावें, व अप्रिय भाषण करणाऱ्या स्त्रीस तात्काल त्यजावें.

नेह चात्यंतसंवासः कर्हिचित् केनचित् सह ॥ राजन्स्वेनापि देहेन किमु जायात्मजादिभिः ॥१७६॥

अर्थ:- हे राजन्, या लोकीं, सतत सहवास कोणाशीं कधींच होत नाहीं. बहुत काय सांगावें आपल्या देहासह वर्तमानही निरंतर सहवास नाहीं, मग स्त्री पुत्रादिकांसह कोठून घडेल !

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदांपदम् ॥ वृणते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः १७७

अर्थ- विचार न करतां एका एकीं कोणतेंही कर्म करूं नये; कारण अविचार महाविपत्तींचें केवल स्थानच आहे आणि संपत्ति गुणा विषयीं लुब्ध असल्या मुळें त्या स्वयमेव येऊन विचार पूर्वक क्रिया करणारास वरतात.

काचं मणिं कांचनमेकसूत्रे मुग्धा निबध्नंति किमत्र चित्रम् ॥ विचारवान् पाणिनिरेकसूत्रे श्वानं युवानं मघवानमाह ॥१७८॥

**अर्थः**- ज्ञानहीन स्त्रिया, एका सूत्रांत कांचेचा मणि व सुवर्णमणि यांस ओंवतात, यांत आश्चर्य काय? कारण व्याकरण शास्त्र कर्ता पाणिनिऋषि विचारवान् असून त्यानें देखील आपल्या एका सूत्रांत "श्वयुवमघोनामतद्धिते" श्वान युवा (तरुण) व मघवा (इंद्र) यांस गुंफिलें आहे.

निर्वाणदीपे किमु तैलदानं चौरे गते वा किमु सावधानं
वयोगते को वनिताविलासः पयोगते कः खलु सेतुबं-
धः ॥१७९॥

**अर्थः**- दीप गेल्यावर त्या पात्रांत तेल घालण्याचा उपयोग काय? चौर गेल्या नंतर सावधपणाचें फल काय? तरुण वय गेल्या नंतर स्त्रीसंबंधि विलासाचा उपयोग काय? आणि पाणी गेल्यावर निश्चयें करून पूल बांधण्याचें फल काय?

अर्थातुराणां न पिता न बंधुः कामातुराणां न भयं न ल-
ज्जा ॥ क्षुधातुराणां न बलं न तेजश्चिंतातुराणां न सु-
खं न निद्रा ॥१८०॥

**अर्थः**- द्रव्यार्जना विषयीं आतुर झालेले लोक पिता व बंधु यांस मानीत नाहींत, आणि कामातुर मनुष्यास भय व लज्जा नाहीं, क्षुधातुर झालेल्या मनुष्यास बल व तेज नसतें. तशीच चिंतातुर जनांस सुख व निद्रा ना०

कुंदकुंजमसुं पश्य सरसीरुहलोचने ॥ असुना कुंदकुं-
जेन सखि मे किं प्रयोजनम् ॥१८१॥

**अर्थः**- हे कमलनयने राधे हा कुंदकुंज (कुंद पुष्पानीं आच्छादित प्रदेश) अवलोकन कर; तेव्हां ती उत्तर देते, हे सखि, मुकार रहित अशा या कुंदकुंजानें मला काय फल आहे? तर मुकारयुक्त जो मुकुंदकुंज (कृष्णयुक्त कुंज) त्या समागमें माझें प्रयोजन आहे.

अनुचितकर्मारंभः स्वजनविरोधो बलीयसि स्पर्धा ॥
प्रमदाजनविश्वासो मृत्युद्वाराणि चत्वारि ॥ १८२ ॥

**अर्थः**- अयोग्य कर्मास आरंभ करणें, स्वजनांशीं विरोध, बलिष्ठा विषयीं स्पर्धा करणें व स्त्रीजनांच्या ठिकाणीं विश्वास मानणें हीं चार मृत्युप्राप्तीचीं द्वारें होत.

## शृंगाररसः

अधरे मधुरा सरस्वती ननु कर्णे मणिकर्णिका
विभाति ॥ शिरसि प्रतिभाति चारुवेणी कथ-
मेणीनयना न तीर्थराजः १८३

**अर्थ**—अधरोष्ठाचे ठायीं मधुर अशी सरस्वती ह्मणजे वाणी, पक्षीं सरस्वती नांवाची नदीही आहे. तशीच कर्णाचे ठिकाणीं मणिकर्णिका ह्मणजे मणिमय अशी कर्णिका (तानवड) पक्षीं मणिकर्णिका ह्मणजे भागीरथी शोभताहे, आणि शिरावर सुंदर वेणी पक्षीं वेणीतुल्य प्रवाहाची जी यमुना ती भासताहे. मग ही हरिणाक्षी सुंदरी प्रयागच कां न म्हणावी? १८३

बाहू द्वौ समृणालमास्यकमलं लावण्यलीलाजलम् ॥ श्रोणी तीर्थशिला च नेत्रशफरी धम्मिल्लशैवालकम् ॥ कांतास्यं स्तनचक्रवाकयुगलं कंदर्पबाणानलैर्दग्धानामवगाहनाय विधिना रम्यं सरो निर्मितम् १८४

**अर्थ**- दोन बाहू हेच कमलाचे देठ, सौंदर्ययुक्तलीला हेंच पाणी, कटिपश्चाद्भाग ही आंत उतरण्याची शिळा, नेत्र हे मासे आणि केशपाश हें शेवाळें होय. तसेंच स्तनयुग्म हें चक्रवाकद्वय होय. अशा प्रकारचें हें कांतारूप रमणीय सरोवर ब्रह्मदेवानें कामबाणाग्नीकरून दग्ध झालेल्या पुरुषांस स्नान करण्या करितां निर्माण केलें आहे १८४

इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुंभा कुसुंभारुणं चारु वासोवसाना ॥ समस्तस्य लोकस्य चेतःप्रवृत्तिं गृहीत्वा घटे न्यस्य यातीव भाति ॥ ॥१८५

**अर्थ**—ही मस्तकावर कुंभ धारण केलेली आणि कुसुंबी रंगाचें भव्य वस्त्र नेसलेली सुंदरी सर्व लोकांच्या मनाच्या प्रवृत्तीस हरण करून आणि त्या कुंभांत ठेवूनच जात आहे कीं काय अशी भासते. १८५

नेदं मुखं मृगविमुक्तशशांकबिंबं नेमौ स्तनावमृत-

पूरितहेमकुंभौ ॥ नैवालकावलिरियं मदनास्त्रशाला नैवेदमक्षियुगलं निगडं हि यूनाम् ॥ १८६ ॥

अर्थ- हें मुख नव्हे, तर मृगरहित चंद्रबिंबच आहे. हे स्तन नव्हेत, तर अमृतानें भरलेले हे सुवर्णकलशच आहेत. ही केशपंक्ती ही नव्हेच तर ही मदनाची अस्त्रशालाच होय. तसेंच हें नेत्रयुग्मही नव्हेच तर तरुण पुरुषांस प्रतिबंधक केवळ शृंखलाच होय. ॥१८६॥

वक्त्रं चंद्रविकासि पंकजपरीहासक्षमे लोचने वर्णः स्वर्णमपाकरिष्णुरलिनां जिष्णुः कचानां चयः ॥ वक्षोजाविभकुंभविभ्रमहरौ गुर्वी नितंबस्थली वाचां हारि च मार्दवं युवतिषु स्वाभाविकं मंडनं १८७

अर्थ- चंद्राप्रमाणें विकासयुक्त मुख, कमलांचा उपहास करणारे नेत्र, सुवर्णास मागें सारणारा वर्ण, भ्रमरांस जिंकणारा केशपाश, हत्तींचे गंडस्थळांचा विलास हरण करणारे स्तन, विस्तीर्ण कटिपश्चाद्भाग, आणि वाणीचें मनोहर मार्दव हें तरुण स्त्रियांचे ठायीं स्वाभाविक भूषण आहे. ॥१८७॥

नूनं हि ते कविवरा विपरीत बोधा ये नित्यमाहुरबला इति कामिनीस्ताः ॥ याभिर्विलोलतरतारकदृष्टिपातैः शक्रादयोपि विजितास्त्वबलाः कथं ताः १८८

अर्थ- जे कवि त्या स्त्रियांस अबला असें नेहेमीं ह्मणतात ते कविश्रेष्ठ खरोखर उलट समजतीचे आहेत. कारण, ज्या स्त्रियानीं इंद्रादिक देवही, चंचळ आहेत तारका (बाहुल्या) ज्यांचे ठिकाणीं अशा दृष्टिपातांनीं जिंकिले मग त्या अबला कशा? १८८

सौधे स्थिता सरभसं निजमुत्तरीयं धर्तुं पुनः स्तनतटात् पतितं प्रवृत्ता ॥ वाचं निशम्य नयनं नयनं ममेति किंचित्तदेवमकरोत् स्मितमायताक्षी ॥१८९

अर्थ- माडीवर उभी राहिलेली व स्तनतटापासून खालीं पडलेला आपला पदर पुनः धारण करण्या करितां घाईनें प्रवर्तमान झालेली कोणीएक विशालनेत्रांची स्त्री, 'नितक्यांत माझे नेत्र हेच खरे नेत्र,'

अशी त्या संध्येची शोभा पाहणाऱ्या कोणा एका रसिकाची वाणी ऐकून किंचित मंदहास्य करिती जाहली.

इदं परम-सुंदरं तनुपुरं कुरंगीदृशां निवार्य खे-
लु शैशवं स्वयमनेन नीतं बलात् ॥ तदागमन-शं
कया मकरकेतुना ऽ विष्कृतौ पयोधरधराधरौ त्रिव-
लिवाहिनी दुस्तरौ १९०॥

अर्थ- हें परमसुंदर हरिणलोचनास्त्रियांचें शरीरपत्तन, शिशुत्वास निवारण करून या मदनानें स्वतः बलात्कारानें (तारुण्यांत) हरण करून नेलें, हें खरें आहे. आणि त्या मकरध्वजानें (मदनानें) पुनः तें शिशुत्व येईल अशा शंकेनें त्रिवळी हीच कोणी एक नदी हिच्या मुळें दुर्गम असे स्तनरूपी पर्वतच मध्यें प्रतिबंध होण्यासाठीं मगर केले आहेत. १९०

सद्यः पुरीपरिसरे ऽपि शिरीषमृद्वी गत्वा जवात्त्रिच-
तुराणि पदानि सीता ॥ गंतव्यमस्ति कियदित्यसकृ-
द्ब्रुवाणा रामाश्रुणः कृतवती प्रथमावतारं ॥१९१

अर्थ- अयोध्यापुरीच्या प्रांतांतच त्या वेळीं घाईघाईनें तीन चार पाउलें जाऊन, आतां किती जावयाचें आहे? असें वारंवार विचारणारी सीता (वनवासास निघतांनां) रामाचे अश्रूंचा प्रथम पात करिती झाली.

जातेति कन्या महती हि चिंता कस्मै प्रदेयेति महा-
न् वितर्कः ॥ दत्ता सुखं यास्यति वा नवेति कन्या-
पितृत्वं खलु नाम कष्टम् १९२

अर्थ- कन्या झाली म्हणजे ही कोणास द्यावी अशा प्रकारची मोठी काळजी लागते. दिली असतां ही सुख पावेल कीं नाहीं, असा महान् विकल्प मनांत घोळतो. तस्मात् कन्येचें पितृत्व खरोखर अति कष्टकारक आहे. १९२.

ध्रुवं ध्वंसो भावी जलनिधिमहीशैलसरितां मतौ मृ-
त्योः शीर्यत्क्षणलघुषु का जंतुषु कथा ॥ तथाप्युच्चै-
र्बंधुव्यसनजनितः कोपि विषमो विवेकप्रोन्माथी दे-

हन्ति हृदयं शोकदहनः ॥ १९३ ॥

अर्थ- समुद्र, पृथ्वी, पर्वत आणि नद्या यांचा नाश जर अवश्य होणार आहे तर मग भग्न झालेल्या कणाप्रमाणें लघु (अल्प) जे प्राणी त्यां विषयीं मृत्यूचें वर्णन काय करावयाचें आहे? तथाऽपि बंधूच्या वियोगापासून उत्पन्न झालेला, परम दुःसह, विचाराचें उन्मूलन करणारा कोणी एक शोकाग्नि हा हृदयास जाळतो. १९३.

किं ब्रूमो हरिमस्य विश्वमुदरे किंवा फणान् भोगिनः
शेते यत्र हरिः स्वयं जलनिधेः सोप्येकदेशे स्थितः॥
आश्चर्यः कलशोद्भवो मुनिरसो यस्यैकहस्तेऽम्बुधि-
र्गंडूषीयति पंकजीयति फणी भृंगीयति श्रीपतिः॥
१९४

अर्थ- 'महत्वाविषयीं' हरीचें काय वर्णन करावें? कांकीं, सर्व जग त्याच्या उदरांत आहे. अथवा शेषाचे फणांची तरी काय वाखाणणी करावी? कांतर त्यांचे ठिकाणीं श्रीहरि स्वतः शयन करितो. आतां विष्णूसहित शेष समुद्राच्या एकदेशाचे ठायीं स्थित आहे ह्मणून समुद्राचें महत्व आश्चर्यकारक आहे, ह्मणावें तर तसेंही नाहीं. केवळ तो कलशोद्भव (अगस्त्य) मुनी मात्र आश्चर्य करण्या सारखा आहे कीं ज्याच्या एका हातांत समुद्र, चुलका (घोटा) प्रमाणें झाला. शेष श्वेत कमला प्रमाणें दिसूं लागला. आणि त्यावर शयन करणारा विष्णु (हरि) भ्रमराप्रमाणें भासूं लागला. १९४.

कस्मै किं कथनीयं कस्य मनः प्रत्ययो भवति॥ रमयति गोपवधूटीः कुंजकुटीरे परं ब्रह्म ॥ १९५ ॥

अर्थ- कोणास काय सांगावें? आणि सांगितलें तरी कोणाचे मनास खरेपणा वाटेल? कीं, परब्रम्ह कुंजवनांतील वल्लीमंडपांत गोपसुंदरींस रमवीत आहे. १९५

आदाय चापमचलं कृत्वाऽहीनं गुणं विषमदृष्टिः
यश्चित्रमच्युतशरो लक्ष्यमभांक्षीन्नमस्तस्मै १९६

* 'हीनं' आणि 'अहीनं' अशीं दोनवेळ पदें काढिलीं पाहिजेत.

**अर्थ-** विषम दृष्टीचा पक्षीं त्रिनेत्र असा जो, अचल ह्मणजे स्थिर पक्षीं पर्वत धनुष्य करून व प्रत्यंचा काढून पक्षीं वासुकीस प्रत्यंचा करून धनुष्यापासून बाण न सोडतां, पक्षीं अच्युत (विष्णु) तोच आहे बाण ज्याचा असा होऊन लक्ष्याचा (त्रिपुराचा) आश्चर्यकारक भेद करिता जाहला, त्या शंकरास नमस्कार असो. १९६

कृष्णेनांब गतेन रंतुमधुना मृद् भक्षिता स्वेच्छया
सत्यं कृष्ण कं एवमाह मुसली मिथ्यांब पश्याननं-
म् ॥ व्यादेहीति विकासिते ऽथ वदने माता समस्तं
जगद् दृष्ट्वा यस्य जगाम विस्मयपदं पायात्स वः
केशवः १९७

**अर्थ-** गोपाल बालक यशोदेस सांगतात.- हे आई यशोदे, खेळाव-यास गेलेल्या कृष्णानें आतां पाहिजे ह्मणून (स्वच्छंदानें) माती खा-ल्ली तें ऐकून यशोदा कृष्णास ह्मणते, कृष्णा, खरेंच काय तूं माती खा-ल्लीस? कृष्ण ह्मणतो, आई, असें कोण सांगतो? यशोदा म्हणते बल-राम. कृष्ण म्हणतो, आई, तो खोटें सांगतो. हें माझें तोंड पहा. यशोदा ह्मणते तर मग तोंड पसर. असें ह्मणतांच विस्तीर्ण केलेल्या ज्याच्या मु-खांत समग्र जग पाहून माता यशोदा आश्चर्य पावती झाली. तो केशा-व तुह्मास रक्षण करो. १९७.

अत्तुं वांछति वाहनं गणपतेराखुं क्षुधार्तः फणी
तं च क्रौंचपतेः शिखी च गिरिजासिंहोऽपि नागा
ननम् ॥ गौरी जन्हुसुतामसूयति कलानाथं च
भालानलो निर्विण्णः स पपौ कुटुंबकलहादीशो-
ऽपि हालाहलम् ॥ १९८ ॥

**अर्थ-** क्षुधेनें पीडित झालेला सर्प (शिवभूषण) गणपतीचें वाहन जो उंदीर त्यास खावयास इच्छितो. आणि स्वामिकार्तिकाचा मयूर त्या सर्पासही खावयास इच्छितो. तसाच पार्वतीचा सिंह गजाननास खाऊं पाहतो, गौरी जान्हवीचा मत्सर करिते, कपाळावरील अग्नि चं-

द्राशीं द्वेष करितो, या प्रमाणें कुटुंबांतील कलहामुळें त्रासलेला तो साक्षात् सदाशिवही, या कलहांतून मुक्त व्हावें म्हणून विष प्राशन करिता जाहला. १९८

दृष्ट्वा षडाननजनुर्मुदितांतरेण पंचाननेन सहसा चतुराननाय॥ शार्दूलचर्म भुजगाभरणं च भ-स्मदत्तं निशम्य गिरिजाहसितं पुनातु ॥ १९९ ॥

अर्थ:- षडानन जन्मला हें पाहून मनांत हर्षित झालेल्या पंचाननानें (पंचमुखशिवानें) एका एकीं चतुर्मुख जो ब्रह्मदेव त्यास व्याघ्रचर्मांबर, सर्पभूषण आणि भस्महीं दिलीं असें ऐकून गिरिकन्याजी पार्वती तिणें हास्य केलें तें तुह्मांस पवित्र करो. १९९

विष्णोरागमनं निशम्य सहसा कृत्वा फणींद्रं गुणं कौपीनं परिधाय चर्म करिणश्शंभो पुरो धावति ॥ दृष्ट्वा विष्णुरथं सकंपहृदयः सर्पोपतद्भूतले कृत्तिर्विस्खलिता ह्रिया नतमुखो नग्नो हरः पातुवः २००

अर्थः- विष्णूचें आगमन एका एकीं झालें तें ऐकतांच सर्पाचा कडदोरा करून व त्यांतून गजचर्माचें कोपीन धारण करून शंभु विष्णूस सामोरे जात असतां गरुडास पाहून मनांत कंपित झालेला सर्प (कंबरेचा) सुटून भूमीवर पडला. अर्थात गजचर्मही गळून पडलें. त्या वेळीं लज्जेनें मुख नम्र केलेला असा नग्न हर तुह्मांस रक्षण करो. २००

किं गोत्रं किमु जीवनं किमु धनं का जन्मभूः किं वयः किं चारित्रममुष्य के सहचराः के वंशजाः प्राक्तनाः ॥ का माता जनकः शिवस्य क इति प्रश्नेण पृथ्वीभृता पृष्टाः सस्मितनम्रमूकवदनाः सप्तर्षयः पांतु वः ॥२०१॥

अर्थ- शंकराचें गोत्र कोणतें, उपजीविका काय, जवळ द्रव्य किती

आहे, जन्मभूमि कोणती, वय केवढें आहे, आचरण कसें आहे, त्याचे मित्र कोण आहेत? पूर्वींचे वंशज कोण? व शिवाचे आईबाप कोणते? या प्रमाणें उत्कंठित झालेल्या हिमाचलानें विचारतांच हास्य मुख आणि नम्र व निःशब्द आहेत मुखें ज्यांचीं असे सप्तर्षि तुह्मांस रक्षण करोत. ॥२०१॥

भस्मांधोरग फूत्कृति स्फुरभवद्भालस्थवैश्वानर-
ज्वालास्विन्न सुधांशुमंडलगलत्पीयूषधारार-
सैः॥ संजीवद्गजचर्म गर्जितभयभ्राम्यद्वृषाक-
र्षणव्यासक्तः सहसाद्रिजोपहसितव्यग्रो हरः
पातु वः २०२

अर्थ- भस्मानें अंध झालेल्या सर्पांच्या फूत्कारानीं प्रज्वलित होणाऱ्या भालस्थित अग्नीच्या ज्वालांनीं पाझरलेल्या चंद्रमंडलापासून गळणाऱ्या अमृतधारांच्या रसांनीं संजीवन पावलेलीं जीं गजचर्मे त्यांच्या गर्जनेनें भिऊन भ्रमण करणारा जो वृषभ (नंदिकेश्वर) त्यास आकर्षण करण्यांत गुंतलेला व तितक्यांत एका एकीं पार्वतीनें हास्य केल्यामुळें व्यग्र झालेला श्रीशंकर तुमचें रक्षण करो. २०२

प्रतिपलमखिलांल्लोकान्मृत्युमुखं निविशतो निरीक्ष्यापि॥ हा हंत चित्तमेतन्न विरमति नाद्यापि विषयेभ्यः॥२०३॥

अर्थ-हर हर! हें चित्त प्रतिपळीं सकल लोक मृत्यूच्या मुखांत प्रवेश करतात असें पाहूनही अद्यापि विषयांपासून विराम पावत नाहीं. २०३

दिनमेकं शशी पूर्णः क्षीणस्तु बहुवासरान्॥
सुखादुःखं सुराणामप्यधिकं का कथा नृणाम् २०४

अर्थ- चंद्र हा एक दिवस (पूर्णिमेस) पूर्ण असतो, आणि पुष्कळ दिवस क्षीण असतो. यावरून देवांसही सुखापेक्षां दुःख अधिक आहे. मग मनुष्यांची काय कथा!! २०४॥

प्रभवति मनसि विवेको विदुषामपि शास्त्रसंभव-

स्तावत् ॥ निपतंति नेत्रविशिखा यावन्नेंदीवराक्षी-
णाम् ॥२०५

अर्थ- जोंपर्यंत कमला प्रमाणें विस्तीर्ण नेत्रांच्या ज्या स्त्रिया त्यांचे नेत्ररूप बाण पडत नाहींत. तों पर्यंतच विद्वानांच्याही मनांत शास्त्रजन्यविचार प्रगट असतो. २०५

हत्वा लोचन-विशिखेर्गत्वा कतिचित्पदानि पद्माक्षी
जीवति युवा न वा किं भूयो भूयो विलोकयति॥२०६

अर्थ- कमलनयना सुंदरी ही आपल्या नेत्रबाणांनी प्रहार करून कांहीं पाउलें गेल्या नंतर तरुण (ज्यास नेत्रबाण मारला तो) जिवंत आहे किंवा नाहीं ह्मणूनच काय पुनः पुनः मागें पहात आहे.॥ २०६॥

मलिना अपि संयमना त्कुटिला अपि सुमनसां स-
मागमतः ॥ बाला अपि मुक्तानामनुषंगान्निर्जरत्व
मुपयांति २०७

अर्थ- मलिन असून कुटिल ह्मणजे वक्र किंवा कपटी असे बालह्मणजे केश पक्षीं अज्ञानी ही संयमनामुळें (बंधनामुळें किंवा निग्रहामुळें) तसेंच सुमनसांच्या (फुलांच्या पक्षीं शुद्धचित्त पुरुषांच्या) समागमानें आणि मुक्तांच्या (मोत्यांच्या पक्षीं जीवन्मुक्तांच्या) अनुषंगानें निर्जरत्वास (तारुण्यास पक्षीं देवत्वास) प्राप्त होतात. २०७

स्नेहसंवर्धितान्बालान् दृढं बध्नाति सुंदरी ॥ करु-
णा हरिणाक्षीणां कुतः कठिनचेतसाम् ॥ २०८॥

अर्थ- सुंदरी स्नेहानें (तेलानें पक्षीं प्रीतीनें) वाढविलेल्या बालांस (केशांस पक्षीं मुलांस) बळकट बांधिते. खरेंच आहे, कठिण मनाच्या स्त्रियांस दया कोठली? ॥२०८॥

समुद्रवीचीव चलस्वभावाः संध्याभ्रलेखेव मुहू-
र्तरागाः॥ स्त्रियो हृतार्थाः पुरुषं निरर्थं निष्पी-
डितालक्तकवत्त्यजंति ॥२०९॥

अर्थ- समुद्र लहरी प्रमाणें चंचल स्वभावाच्या, संध्याकाळचे मेघमाले प्रमाणें क्षणिक राग (अनुराग पक्षीं तांबडेपणा) धारण

करणाऱ्या आणि पुरुषांपासून द्रव्य हरण केलेल्या स्त्रिया निर्धन पुरुषास, पिळून घेतलेल्या अळित्याचे कापसाप्रमाणें टाकून देतात. २१०

सैव साध्वी सुभक्तश्च सुस्नेहः सरसोज्वलः॥
पाकः संजायते यस्याः करादप्युदरादपि॥ २११॥

अर्थ- जिच्या हातांतून आणि उदरांतून देखील सुभक्त (ज्यांत उत्तम भात आहे असा. पक्षीं चांगला भक्तिमान्) सुस्नेह (चांगली स्निग्धता ज्यांत आहे असा. पक्षीं प्रीति ठेवणारा) सुरस आणि स्वच्छ असा पाक (स्वयंपाक पक्षीं मुलगा) उत्पन्न होतो तीच साध्वी ह्मणजे पतिव्रता होय. २११.

लज्जावशाच्च नतमंथर-दृष्टिपातं यैश्चुंबितं कुलवधूवदनारविंदम्॥ तेषामनेक-पुरुषव्रणिताधरेषु सक्तिः कथं भवति वेशवधूमुखेषु २१२

अर्थ- ज्याणीं लज्जेमुळें नम्र आणि मंद अशा दृष्टिपातानें युक्त अशा कुलांगनेच्या मुखकमलाचें चुंबन केलें त्यांची अनेक पुरुषांनीं ज्यांस दंतक्षतें केलीं असतात अशा वारांगनाच्या मुखाचे ठायीं सक्तता कशी होते. कोण जाणे!! २१२.

अपि ललितसुगुणवेणिः सालंकाराऽपि वा सुवर्णाऽपि॥ रघुतिलकविहीना चेद्वाणी रमणीव नैव कल्याणी॥ २१३॥

अर्थ- सुंदर माधुर्यादि गुणप्रवाहयुक्त, उपमादि अलंकारानीं भरलेली आणि उत्तम वर्णांनीं सुशोभित अशीही वाणी असून स्त्रीप्रमाणें रघुतिलक जो रामचंद्र त्याच्या गुणांनीं हीन असेल तर ती कल्याणकारक नसेच. पक्षीं सुंदर तिपेडी वेणी घालून अनेकअलंकार धारण केलेली व गौरवर्णाची अशी ही स्त्री असून ती जर रघुतिलक विहीना, र आणि ल यांचें सावर्ण्य असल्यामुळें लघुह्मणजे लहान जो तिलक अर्थात् कुंकुम तिलक तेणें करून हीन असल्यास शुभकारक नाहीं. २१३॥

प्रणमत्युन्नतिहेतोर्जीवनहेतोर्विमुंचति प्राणान्॥
दुःखीयति सुखहेतोः कोमूढः सेवकादन्यः॥२१४

अर्थ- सेवक हा आपली उन्नति व्हावी म्हणून नेहेमीं नम्र होतो. जीवनाच्या इच्छेनें प्राण देतो. सुखाकरितां दुःख भोगतो. अशा सेवकाहून अन्य कोण मूर्ख आहे? २१४.

सेवा श्ववृत्तिर्यैरुक्ता न तैः सम्यगुदाहृतम्॥
स्वच्छंदचारी कुत्र श्वा विक्रीतासुः क्व सेवकः॥२१५

अर्थ- ज्याणीं सेवेस (चाकरीस) श्ववृत्ति ह्मणजे कुत्र्याची उपजीविका असें ह्मटलें आहे त्यांनीं तें चांगलें विचारपूर्वक ह्मटलें नाहीं. कारण स्वच्छंदानें फिरणारा कुत्रा कोणीकडे? आणि ज्यानें आपले प्राण दुसऱ्यास विकले आहेत असा परतंत्र सेवक कोणीकडे? २१५॥

द्वयं जहाति सेवकः सुखं च मानमेव च॥ यदर्थमर्थमीहते तदेव तस्य हीयते॥२१६॥ ७॥

अर्थ- सेवक हा सुख आणि मान या दोन गोष्टींचा त्याग करतो. तस्मात् ज्या साठीं चाकरीनें द्रव्याची इच्छा करितो त्याचें तेंच(सुख व मान)सेवेंत नाहींसें होतें. २१६

आकिंचिन्यादतिपरिचयाज्जायया पेक्ष्यमाणो भूपालानामननुसरणाद्विश्वदेवाखिलेभ्यः॥ गेहे-तिष्ठन् कूर्मनिरलसः कूपकूर्मः सधर्मा किंजानीते भुवनचरितं किं सुखं चोपभुंक्ते॥२१७॥श्रीशम्

अर्थ- दारिद्र्यामुळें व अतिपरिचयामुळें भार्येनें उपेक्षा केलेला आणि राजांस न अनुसरल्यामुळें सर्वांपासून भीति बाळगणारा सर्वदा विहिरींतल्या कांसवा प्रमाणें घरींच असणारा व आळशी असा बुद्धिहीन मनुष्य जगांतलें कोणतें वृत्त जाणतो? आणि कोणत्या सुखास प्राप्त होतो? २१७

लक्ष्मि क्षमस्व वचनीयमिदं दुरुक्तमंधीभवंति पुरुषास्त्वदुपासनेन॥ नोचेत्कथं कमलपत्रविशालनेत्रो नारायणः स्वपिति पन्नगभोगतल्पे२१८

अर्थ- हे लक्ष्मि बोलण्यास योग्य असें हें दुर्भाषण क्षमाकर. तें असें- हे पुरुष तुझ्या सान्निध्यानें आंधळे होतात. असें नाहीं जर ह्मणावें तर कमलपत्राप्रमाणें विशाल नेत्रांचा नारायण सर्पशरीराच्या मंचकावर कसा निजतो? २१८

उडुगणपरिवारो नायकोप्योषधीनाममृतमय-
शरीरः कांतियुक्तोपिचंद्रः॥ भवेतिविगतरश्मि
मंडलं प्राप्य भानोः परसदन निविष्टः को लघु-
त्वं न याति॥२१९॥

अर्थ- सर्व नक्षत्र समूह ज्याचा परिवार आहे असा आणि ओषधींचा नायक असून अमृतमयशरीराचा व कांतियुक्त असाही चंद्र सूर्याच्या मंडलास प्राप्त होऊन तेजोहीन होतो. खरेंच आहे, कीं, परगृहीं प्रविष्ट झालेला कोण पुरुष लघुत्वास प्राप्त होत नाहीं.॥२१९॥

कष्टं खलु मूर्खत्वं कष्टतरं यौवनेषु दारिद्र्यम्
कष्टादपि कष्टतमः परगृहवासः परान्नं च॥२२०॥

अर्थ- मूर्खत्व हें कष्टकारक आहेच; परंतु त्यापेक्षांही तारुण्यांत दारिद्र्य अधिक कष्टकारक आहे. परान्न आणि परगृहवास तर सर्वांत अधिक क्लेशकारक आहे. २२०.

सर्पाः पिबंति पवनं नच दुर्बलास्ते शुष्कैस्तृणै-
र्वनगजा बलिनो भवंति॥ कंदैः फलैर्मुनिवराः
क्षपयंति कालं संतोष एव पुरुषस्य परं निधानं
॥ ॥२२१॥ ॥

अर्थ- सर्प, वारा पिऊन राहतात, परंतु दुर्बल नाहींत. तसेच रानांतील हत्ती वाळलेल्या गवतानें बळकट होतात. आणि मुनिवर (ऋषि) हे कंदमूल फलें यांवर कालक्रमण करितात. तस्मात् संतोष हाच पुरुषास महानिधि होय.२२१॥

तन्मूलं गुरुतायास्तत्सौख्यं तद्यशस्तदोजित्यं
तत्सौभाग्यं पुंसां यदेतदप्रार्थनं नाम॥ २२२ ॥

**अर्थ**- हें जें अप्रार्थन (याचना न करणें) ह्मणून आहे तें प्रतिष्ठेचें मूल आहे. तेंच सौख्य, तेंच यश आणि तेंच उत्कृष्ट होय. तसेंच पुरुषाचें ऐश्वर्यही तेंच होय. २२२.

यो न ददाति न भुंक्ते सति विभवे नैव तस्य तद्द्रव्यम् ॥ तृणमयकृत्रिमपुरुषो रक्षति सस्यं परस्यार्थे ॥२२३

**अर्थ**- संपत्ति असतां जो पुरुष दान करीत नाहीं आणि उपभोगही घेत नाहीं त्याच्याजवळचें तें द्रव्य त्याचें नव्हे. तर जसा कृतीनें केलेला पुरुष दुसऱ्या करितां धान्य रक्षण करितो तसाच हाही दुसऱ्या साठीं त्या धनाचें रक्षण करितो. २२३॥

यदि भवति धनेन धनी क्षितितलनिहितेन भोगरहितेन ॥ तस्माद्वयमपि धनिनस्तिष्ठति नः कांचनो मेरुः २२४

**अर्थ**- जमिनींत पुरून ठेवलेल्या उपभोगरहित अशा धनानें जर तो धनवान् होतो तर आम्हीही धनवानच आहों. कारण सुवर्णमय मेरु आहे तो आमचाच आहे. २२४.

सविप्रपादोदककर्दमानि सवेदशास्त्रध्वनिगर्जितानि ॥ स्वाहास्वधाकारनिरंतराणि स्वानंदतुल्यानि गृहाणि तानि २२५

**अर्थ**- ज्या गृहांत ब्राह्मणांच्या चरण-क्षालनोदकेंकरून कर्दम (चिखल) होतआहे, जेथें वेदशास्त्रध्वनींच्या गर्जना होतात आणि निरंतर स्वाहाकार, स्वधाकार जेथें चालू आहेत अशीं जीं गृहें तीं केवळ स्वानंदलोकतुल्य होत. २२५॥

न विप्रपादोदकपंकिलानि न वेदशास्त्रध्वनिगर्जितानि ॥ स्वाहास्वधाकारविवर्जितानि श्मशानतुल्यानि गृहाणि तानि ॥२२६॥

**अर्थ**- जेथें ब्राह्मणांचें चरणोदक पडून चिखल होत नाहीं. जेथें वेदशास्त्रध्वनीच्या गर्जना होत नाहींत, आणि स्वाहाकर व स्वधाकार

जेथें कधींच होत नाहींत. तीं गृहें श्मशानतुल्य होत. ॥२२६॥ ७॥

बधिरयति कर्णविवरं वाचं मूकयति नयनमंधयति॥ विकृतयति गात्रयष्टिं संपद्रोगोऽयमद्भुतो राजन् २२७

अर्थ:- हे राजा हा आश्चर्यकारक संपत्तिरूप रोग कर्णरंध्रांस बधिर करितो, वाणीस मुकी करतो, नेत्रांस अंध करितो आणि शरीरास विकारयुक्त करितो. २२७.

गणयंति नापशब्दं न वृत्तभंगं क्षयं न चार्थस्य॥रसिकत्वेनाकुलिता वेश्यापतयः कुकवयश्च॥२२८॥

अर्थ:- रसिकपणानें व्याकुल झालेले वेश्यापति आणि कुत्सित कवि हे अपशब्दास गणित नाहींत. वृत्तभंग झालेला मनांत आणीत नाहींत. आणि अर्थक्षयाचाही विचार करीत नाहींत. २२८.

वयमिह परितुष्टा वल्कलैस्त्वं च लक्ष्म्या सम इह परितोषो निर्विशेषोऽवशेषः॥ स हि भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला मनसि च परितुष्टे कोऽर्थवान् को दरिद्रः॥२२९॥

अर्थ:- हे राजा, या जगांत आह्मीं वल्कलानीं संतुष्ट आहोत. आणि तूं लक्ष्मीनें तुष्ट आहेस. यांत उभयतांचाही संतोष सारखा आहे. बाकी सर्व गोष्टींत तुझें व आमचें कांहीं न्यूनाधिक नाहीं. ज्यास तृष्णा अधिक असते तोच दरिद्री होय. मन संतुष्ट असतां कोण द्रव्यवान् आणि कोण दरिद्री? ॥२२९॥

प्राक् पादयोः पतति खादति पृष्ठमांसं कर्णे कलं किमपि रौति शनैर्विचित्रं॥ छिद्रं निरूप्य सहसा प्रविशत्यशंकः सर्वं खलस्य चरितं मशकः करोति २३०

अर्थ- मशक (चिलट) खलाचें सर्वचरित्र आचरण करितो. पूर्वीं पायांवर येऊन पडतो. आणि पाठीचें मांस खातो. कानांशीं हळूच मं-

जुळ आणि विचित्र शब्द करितो. तसाच थोडेंसें छिद्र सांपडलें कीं, निर्भयपणानें एकदम प्रवेश करितो. २३०॥

पिशुनत्वमेव विद्या-परदूषणमेव भूषणं येषां परदुःखमेव सौख्यं शिव शिव ते केन वेधसा सृष्टाः॥ २३१॥

अर्थः- चाहाडखोरपणा हीच ज्यांची विद्या होय आणि दुसऱ्यांस दूषण देणें हेंच ज्यानां भूषण वाटतें, तसेंच दुसऱ्याचें दुःख तेंच ज्यांचें सुख. शिव शिव! असे जे मनुष्य ते कोणत्या ब्रह्मदेवानें उत्पन्न केले असतील? २३१॥

कृतमंदपदन्यासा विकचश्रीश्चारुशब्दभंगवती॥ कस्य न कंपयते कं जरेव जीर्णस्य सत्कवेर्वाणी २३२

अर्थः- जिच्यांत पदन्यास (पदरचना पक्षीं पावूल टाकणें) अतिसूक्ष्म असून जिची शोभा विकच ह्मणजे प्रकट पक्षीं केशरहित आहे अशी आणि सुंदर शब्दभंग (श्लेष पक्षीं अर्धे शब्द) युक्त सत्कवीची वाणी ती, जशी जरा वृद्ध मनुष्याचें मस्तक कांपविते तशी कोणा रसज्ञाचें शिर हालवीत नाहीं. २३२॥

कर्णामृतं सूक्तिरसं विमुच्य दोषेषु यत्नः सुमहान् खलस्य॥ अवेक्षते केलिवनं प्रविष्टः क्रमेलकः कंटकजालमेव २३३

अर्थः- कर्णास अमृतासारखा जो सुभाषित संबंधि रस त्यास सोडून दोषांचे ठिकाणीं दुर्जनाचा मोठा प्रयत्न असतो. सुंदर क्रीडोद्यानांत प्रविष्ट झालेला उंठ कंटकवृक्षासच शोधितो. २३३.

अयि मलयज महिमाऽयं कस्य गिरामस्तु विषयस्ते॥ उद्गिरतो यद्गरलं फणिनः पुष्णासि परिमलोद्गारैः २३४.

अर्थः- हे मलयपर्वतीं उत्पन्न झालेल्या चंदना, हें तुझें महत्व कोणाच्या वाणीस विषयभूत होईल. कारण विषोद्गार टाकणारे सर्पांस-

ही तूं सुगंधोद्गारानीं पोषण करीत आहेस. २३४ ॥

पाटीर तव पटीयान् कः परिपाटीमिमामुरी-
कर्तुं ॥ यत्पिषतामपि नृणां पिष्टोपि तनोषि प-
रिमलैः पुष्टिं २३५

अर्थ- हे चंदना, तुझ्या या वर्तनपद्धतीचा अंगीकार करण्यास कोण पुरुष समर्थ आहे? कारण तुला चूर्ण केलें तरी तूं चूर्ण करणाऱ्या मनुष्यासही आपल्या परिमलानीं (सुगंधानीं) पुष्टता देतोस. २३५

पत्राणि कंटकशतैः परिवेष्टितानि वार्ताऽपि
नास्ति मधुनो रजसांधकारः ॥ आमोदमात्र र-
सिकेन मधुव्रतेन नालोकितानि तव केतकि दू-
षणानि २३६

अर्थ- पानें शेंकडों कांट्यानीं वेष्टिलेलीं, मकरंदाची तर वार्ताही नाहीं, रजाच्या योगानें अंधकार पडावयाचा, परंतु हे केतकी, केवळ सुगंधाविषयीं रसिक अशा भ्रमरानें तुझीं तीं दूषणें अवलोकन केलीं नाहींत. २३६.

चंदने विषधरान्सहामहे वस्तु सुंदरमगुप्ति-
मत् कुतः ॥ रक्षितुं वद किमात्मसौष्ठवं संचिताः
खदिर कंटकास्त्वया २३७.

अर्थ- चंदनाचे ठिकाणीं सर्प आहेत त्यांस आह्मीं मान्य करितों; कारण सुंदर पदार्थ रक्षणावांचून कोठला असणार? परंतु हे खदिरा, त्वां कोणतें आपलें सौंदर्य रक्षण करण्या करितां कांट्यांचा संचय केला आहेस? सांग बरें. २३७ ॥

किंशुक किं शुकमुखवत् कुसुमानि विकासय-
स्यनिशम् ॥ यस्यां जनोऽनुरागी सा गीरेतैः क-
दाऽपि नोच्चार्या २३८ ॥

अर्थ- हे पळसा, तूं निरंतर राघूच्या चोंचीप्रमाणें आरक्तवर्ण पुष्पें काय ह्मणून प्रकाशित आहेस! जिचे ठिकाणीं सर्व लोक अनुराग ठेवतात ती शुकवाणी यां पुष्पांकडून कधींही उच्चारली जाणार नाहीं २३८.

उन्मत्त धूर्त तरुणेंदुनिवासयोग्ये स्थाने पिशाच-
पतिना विनिवेशितोसि ॥ किं कैरवाणि विकसंति
तमः प्रयाति चंद्रोपलो द्रवति वाधिरुपैति वृद्धि-
म् ॥ २३९ ॥

अर्थ- हे उन्मत्ता धूर्ता (धोतऱ्या), पिशाचपति जो शिव त्याणें बाल-
चंद्राचें निवासास योग्य स्थान जें आपलें मस्तक त्या ठिकाणीं तुला-
धारण केलें आहे. परंतु तुझ्या उदयानें चंद्रविकासी कमलें विक-
सित होतात काय? अंधकार जातो काय? चंद्रकांतमणि पाझर-
तो काय? आणि समुद्रास भरती येते काय? ॥२३९॥ श्रीशाम्

परार्थे यः पीडामनुभवति भंगेऽपि मधुरो
यदीयः सर्वेषामिह खलु विकारोऽप्यभिमतः
न संप्राप्तो वृद्धिं यदि सभृशमक्षेत्रपतितः किं-
मिक्षो दोषोसौ न पुनरगुणाया मरुभुवः २४०

अर्थ- जो दुसऱ्यासाठीं स्वतः पीडेचा (चरकांत) अनुभव घेतो आ-
णि जो भंग झाला तरी मधुर असतो, ज्याचा विकार (साखर) ही
या जगांत सर्वांस निःसंशय प्रिय आहे तो ऊंस जर अगदीं अयोग्य
अशा शुष्क भूमींत पडला असल्या मुळें वृद्धीस पावला नाहीं त-
र तो दोष उंसाचा आहे काय? नाहीं. तर सुपीकपणाच्या गुणानें
शून्य जी मारवाडदेशांतली शुष्कभूमि तिचा तो दोष होय. २४०॥

कमलिनि मलिनीकरोषि चेतः किमिति बकैर-
वहेलिताऽनभिज्ञैः ॥ परिणतमकरंदमार्मिकास्ते
जगति भवंतु चिरायुषो मिलिंदाः ॥ २४१ ॥ श्रीशं

अर्थ- हे कमलिनि, तुझ्या रसाविषयीं अज्ञानी अशा बगळ्यांनीं
हेळणा केल्यामुळें आपले मनाला काय असा खेद करून घेतेस?
त्या जगांत तुझ्या परिपक्व झालेल्या मकरंदरसाचे मार्मिक जे भ्र-
मर ते चिरायुषी असोत. २४१

ऊर्णां नैषे दधाति नैष विषयो वाहस्य दोहस्य

वा तृप्तिर्नास्य महोदरस्य बहुभिर्घासैः पलालैरपि॥
हा कष्टं कथमस्य पृष्ठशिखरे गोणी समारोप्यते को
गृण्हाति कपर्दकैरलमिति ग्राम्यैर्गजो हास्यते॥२४२

अर्थ- हा लेंकर बाळगीत नाहीं. तसाच हा बसून जाण्याच्या किंवा दूध काढण्याच्या उपयोगीं नाहीं. आणि या महोदराची पुष्कळ गवतानें किंवा कडब्यानेंही तृप्ति व्हावयाची नाहीं. अरे बा! याच्या पृष्ठभागावर गोणी तरी कशी चढवितां येईल? अहो याला तीन कवड्यांनीं तरी कोण घेतो? जाऊं द्या. या प्रमाणें गांवढे लोक हत्तीचा उपहास करितात. २४२ ॥श्रीरामा॥ ७॥

ग्रासोद्गलितसिक्थस्य करिणः किं गतं भवेत् ॥
पिपीलिका तु तेनैव सकुटुंबोपजीवति॥ २४३ ॥

अर्थ- हत्तीच्या घांसांतून एक शीत गळून पडलें असतां हत्तीचें काय कमी होईल? परंतु मुंगी कुटुंबासहित त्या शिताबर आपली उपजीविका करते२४३

अमितगुणोऽपि पदार्थो दोषेणैकेन निंदितो भवति
निखिलरसायनमहितो गंधेनोग्रेण लशुन इव॥२४४

अर्थ-पुष्कळ गुणानीं युक्त असाही पदार्थ एका महादोषानें निंद्य होतो. जसा सर्व रसायनांत मान्य असाही लसूण परंतु एका उग्रवासामुळें निंद्य झाला आहे तद्वत्. २४४

अहिरहिरिति संभ्रमपदमितरजने किमपि कातरे भवतु॥ विहगपतेराहारः सतुंसरलमृणालदलरुचिरः २४५

अर्थ- सर्प,सर्प,अशा प्रकारें कांहीं एक उच्चार भितऱ्या अशा इतर जनाचे ठिकाणीं घाबरेपणा उत्पन्न करण्यास कारण होवो; परंतु गरुडाचा तो,सरळ देंठासहित कमळाच्या पत्राप्रमाणें सुंदर असा आहार आहे२४५

अपसरणमेव शरणं मौनं वा तत्र राजहंसस्य ॥
कटु रटति निकटवर्ती वाचालष्टिट्टिभो यत्र॥२४६॥

अर्थ- ज्या ठिकाणीं समीप असणारा वाचाल टिटवा, कर्ण कटु शब्द करीत आहे त्या ठिकाणीं राजहंसास निघून जाणें अथवा मौन धारण करणें हेंच योग्य आहे. २४६॥

जले तैलं खले गुह्यं पात्रे दानं मनागपि॥ प्राज्ञे

शास्त्रं स्वयं याति विस्तारं वस्तुशक्तितः॥२४७॥

अर्थ- थोडेंही तेल पाण्यामध्यें, गुह्य खलाचे ठिकाणीं, दान सत्पात्राचे गायीं आणि शास्त्र बुद्धिमान् पुरुषाचे ठिकाणीं वस्तुशक्तीच्या योगानें आपलें आपण विस्तार पावतें. २४७॥

उद्योगः कलहः कंडूर्द्यूतं मद्यं परस्त्रियः॥ आहारो मैथुनं निद्रा सेवनात्तु विवर्धते॥ २४८ ॥

अर्थ- उद्योग, कलह, खरूज, जुवेबाजी, मद्यपान, परस्त्रीचें व्यसन, आणि आहार, मैथुन व निद्रा हे पदार्थ जों जों सेवन करावे तों तों वृद्धिंगत होतात. २४८

धाम्नि विरिति परितः प्रसिद्धिभाजि प्रकटित तेजसि दुर्जये कृशानौ॥ निजवसुनिकुरंबमस्तवेलाव्यतिकरवान्निदधे सरोजबंधुः २४९॥

अर्थ- अस्तसमयाचा संबंध प्राप्त झाला असतां कमलबांधव (सूर्य) हा, शब्द आहे अशा सर्वत्र प्रसिद्धीस पावलेल्या आणि प्रगट तेजाचा असल्यामुळें इतरांनीं जिंकण्यास अशक्य अशा हुताशनाचे गायीं आपला किरणसमुदायरूप निक्षेप (ठेवा) ठेविता झाला. ॥२४९॥

नाहं जलद कदाचिच्चातक इव जीवनं याचे॥ ॥ अहमस्मि नीलकंठस्तुष्ये त्वच्छब्दमात्रेण॥ २५० ॥

अर्थ- मयूराची उक्ति- हे मेघा, मी चातका साररवा कधीं जीवन (पाणी पक्षीं उपजीविका साधन) तुज पासून मागत नाहीं. मी नीलकंठ (मयूर पक्षीं तन्नामा प्रियमित्र) आहें याकरितां केवळ तुझ्या शब्दानेंच माझा संतोष आहे. २५०॥

सा कविता सा वनिता यस्याः श्रवणेन दर्शनेनापि कविहृदयं विटहृदयं सरलं तरलंच सत्वरं भवति २५१

अर्थ- जीच्या श्रवणें करून व दर्शनें करूनही क्रमानें कवीचें व जाराचें हृदय सरळ व चंचळ त्वरित होतें तीच कविता व तीच स्त्री होय २५१

अविदितगुणाऽपि सत्कवेर्भणितिः कर्णेषु किरति मधुधाराम्॥ अनधिगत परिमलापिहि हरति दृशं

मालतीमाला २५२

अर्थः- कवीची वाणी, जरी तिच्यांतील गुण समजले नाहींत तरी ती ऐकली असतां कर्णाचे ठिकाणीं मधाची धारच जशी काय सोडिते. खरेंच आहे, जाईच्या फुलाची माळ, तिचा सुगंध जरी समजला नाहीं तरी ती पाहतांच दृष्टीस हरण करिते. २५२॥

कांतं श्रीरघुतिलकं सर्व जगत्पालकं विहाय जनः
अनुसरति नरं कांतं नानाकष्टाश्रयं शिव शिवाय २५३

अर्थः- हा जन, सर्व जगत्पालक जो परम रमणीय श्रीरामचंद्र त्यास टाकून आपलें कल्याण होण्याकरितां अनेक कष्टांस आश्रयभूत व कांत (सुंदर) अशा नराप्रत अनुसरतो. अथवा 'क' आहे अंतीं ज्याच्या तो कांत असा नर ह्मणजे अर्थात् नरक त्यास अनुसरतो. शिव शिव! ॥२५३॥

यातायातैः सुबहुभिः श्रांतोसि यदि हे सखे ॥
एकं कुरु घनच्छाय-सीताराम पदं भज ॥ २५४॥

अर्थः- हे मित्रा, बहुत प्रकारच्या यातायातीनीं जर तूं श्रमी झाला असशील तर एक कर कीं, मेघा प्रमाणें श्यामवर्ण जो रामचंद्र, त्याच्या चरणांचें भजन कर. यद्वा, दाट छाया ज्यांत आहे अशा बागेचा आश्रय कर.

मानुष्यं वरवंशजन्म विभवो दीर्घायुरारोग्यता स-
न्मित्रं सुसुतः सती प्रियतमा भक्तिश्च नारायणे॥
विद्वत्त्वं सुजनत्व मिंद्रियजयः सत्पात्रदाने रतिस्ते
पुण्येन विनात्रयोदश गुणाः संसारिणां दुर्लभाः २५५

अर्थ- मनुष्यत्व, उत्तमवंशांत जन्म, ऐश्वर्य, दीर्घ आयुष्य, आरोग्य, सन्मित्र, सुपुत्र, पतिव्रता स्त्री, नारायणाचे ठिकाणीं भक्ति, विद्वत्ता सौजन्य, इंद्रियनिग्रह आणि सत्पात्रीं दान करण्याची प्रीति. ते हे तेरा गुण पुण्यावांचून संसारी जनांस दुर्लभ आहेत. २५५॥

वंशो विश्वावतंसो जनुरनुपहतं स्थानं मौन्नत्यकां-
तं लीला शीलानुकूला क्षपित कलिमला कापि विद्या
ऽनवद्या॥ वाणी वेणी गुणानां समधिकं यशसां सौ-
धिका सौः धिकाश्रीः श्रीगंगोरी मयूरी सुंदर पुरेह.

र त्वत्कृपाया विपाकः॥ २५६॥

अर्थः- जगांत श्रेष्ठ असा वंश, निर्दोष जन्म, औदार्यानें शोभणारें अंतःकरण, स्वभावास अनुकूल असा उद्योग, कलिमलाचा नाश करणारी कोणती तरी निर्मल विद्या, गुणप्रवाहयुक्त वाणी, मोठमोठ्या यशांस साधणारी पुष्कळ संपत्ति, हें सर्व, हे पार्वतीरूप मयूरीस आल्हादविणाऱ्या मेघा, हे त्रिपुरनाशका शंकरा आपल्या कृपेचें फळ आहे. २५६॥ श्रीशां

इदं तत्स्नेह सर्वस्वं सममाढ्य दरिद्रयोः॥ अचंदन मनोशीरं हृदयस्यानुलेपनम्॥ ॥२५७॥

अर्थ- श्रीमंत व दरिद्री या दोघांस सारखें, स्नेहाचें सर्वस्वच असें तें हें (अपत्य) चंदन आणि वाळा यां वांचून हृदयाचें अनुलेपन (उटी) आहे. २५७॥

गृहे जानुचरः केल्यां मुग्धस्मितमुखांबुजः॥ पुत्रः पुण्यवतामेव पात्री-भवति नेत्रयोः॥ २५८॥ ७॥

अर्थः- घरांत रांगणारा व खेळतांनां मुखकमलाचे ठायीं मंदहास्य करणारा पुत्र पुण्यवानांच्याच नेत्रांस पात्र होतो. २५८॥

अंतःकरणतत्वस्य दंपत्योःस्नेह संश्रयात्॥
आनंदग्रंथिरेकोयमपत्यमिति बध्यते २५९

अर्थः- स्त्रीपुरुषांच्या अंतःकरणरूप तत्त्वांतील स्नेहभावामुळें अतिबळकट अपत्य या नांवाचा हा एक आनंदाचा ग्रंथि (गांठ) च बांधला जात आहे. २५९॥

दिग्वाससं गतव्रीडं जटिलं धूलिधूसरम्॥
पुण्योधिका हि पश्यंति गंगाधरमिवात्मजं २६०

अर्थः- पुण्यवान पुरुषच, शंकराप्रमाणें दिगंबर (नग्न) लज्जारहित जटा धारण करणारा आणि धूलिनें (भस्मानें पक्षीं मातीनें) धूसर (पांढरा) अशा पुत्राप्रत पाहतात. २६०

उरोरुहाद्दुहमिनैः पयोभिरापूर्य केल्या निजमास्यगर्भम्॥ फूत्कृत्य मातुर्वदने हसंतं तनूभवं पश्यति कोपि धन्यैः २६१

अर्थ- स्तनांपासून उत्पन्न झालेल्या दुधानें आपल्या मुखाचा अवकाश भरून स्वच्छंदानें मातुश्रीच्या मुखावर फूत्कार सोडून हसणाऱ्या पुत्रास कोणी पुण्यवान् असेल तो अवलोकन करतो. २६१॥

आनंदस्रुतिरात्मनो नयनयोरंतः सुधांजनं प्रे-
स्तारः प्रणयस्य मन्मथतरोः पुष्पं प्रसादो रतेः ॥
आलानं हृदयद्विपस्य विषयारण्येषु संचारिणोर्दं-
पत्योरिह लभ्यते सुकृततः संसारसारः सुतः २६२.

अर्थ- अंतःकरणांतील आनंदाचा केवळ झराच, नेत्रांच्या आंत घालावयाचें अमृतयुक्त अंजनच, प्रेमाची शय्याच, कामवृक्षाचें केवळ पुष्पच, सुरतक्रीडे संबंधीं प्रसाद आणि हृदयरूप गजाचें बंधनस्थानच असा व सर्व संसाराचें सार असा पुत्र विषयारण्यांत संचार करणाऱ्या स्त्री पुरुषांस परम पुण्यानें या जगांत प्राप्त होतो. २६२॥ श्रीराम॥

प्रज्ञया वा विसारिण्यायो बलेन धनेन वा ॥ धुरं
वहति गोत्रस्य जननी तेन पुत्रिणी॥ २६३॥ ७॥

अर्थ- जो आपल्या प्रसरणशील अशा बुद्धीनें अथवा बलानें किंवा द्रव्यानें कुळाचा भार धारण करतो त्याच पुत्राच्या योगानें मातुश्री पुत्रवती होय. २६३॥

विद्याविहीना बहवोपि पुत्राः कल्पायुषः संतु पितुः
किमेतैः॥ क्षयिष्णुना वाऽपि कलावता वा तस्य
प्रमोदः शशिनेव सिंधोः २६४

अर्थ- विद्याहीन असे पुष्कळही पुत्र कल्पायुषी असोत, पित्याला त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. त्यास क्षीणायु कां असेना; परंतु जो कलावान्- (विद्वान् पक्षीं षोडशकलात्मक) आहे अशा पुत्राच्या योगानें आनंद होतो. जसा चंद्राच्या योगानें समुद्रास तद्वत्. २६४

पात्रं न तापयति नैव मलं प्रसूते स्नेहं न संहरति
नैव गुणान् क्षिणाति॥ द्रव्यावसानसमये चलतां नै-
धत्ते सत्पुत्र एव कुलसद्मनि कोपि दीपः॥ २६५॥

अर्थ- वंशरूपी सदनांत सत्पुत्र हाच कोणी एक विलक्षण दीपआ-

है. हा सत्पुत्र दीप पात्रास (समई इ० पक्षीं सत्पात्रास) ताप (उष्णता पक्षीं दुःख) देत नाहीं. मलास (काजळ पक्षीं पातक) प्रसवत नाहीं. स्नेहाचा (तेलाचा पक्षीं प्रीतीचा) संहार करीत नाहीं. गुणांस (वातीस पक्षीं शौर्यादि गुणांस) क्षीण करीत नाहीं. द्रव्याचा (तेल वात इत्यादि पदार्थ,पक्षीं धन) नाश झाला तरी अंतःकरणांत चंचलता धारण करीत नाहीं २६५

पिबंति मधु पद्मेषु भृंगाः केसर धूसराः॥ हंसाः शैवालमश्नंति धिग्दैवं मसमंजसम्॥ २६६॥ श्रीशम्

अर्थ- कमलांतील धूलीनें पांढरे झालेले भ्रमर त्या कमलांत असलेला मकरंद पितात. आणि स्वभावतः शुद्ध हंस शेवाळें खातात. तस्मात् अशा अविचारी दैवास धिक्कार असो.२६६

दैवं फलति सर्वत्र न विद्या न च पौरुषम्॥
समुद्र मथनाल्लेभे हरिर्लक्ष्मीं हरो विषम् २६७

अर्थ- सर्व व्यापारांत दैवच फलद्रूप होतें. विद्या आणि पराक्रम कांहीं फळ देत नाहींत. पहा, समुद्रमंथनापासून विष्णूस लक्ष्मी मिळाली. आणि शंकरास विष मिळालें!! २६७

कर्मणा बाध्यते बुद्धि र्न बुद्ध्या कर्म बाध्यते॥
सुबुद्धिरपि यद्रामो हैमं हरिणं मन्वगात् २६८

अर्थ- कर्माच्या योगानें बुद्धीस बाध येतो. बुद्धीनें कर्मास बाध येत नाहीं. कारण महाबुद्धिमान् असाही राम सोन्याच्या हरिणामागें ला० २६८

अनुकूले सति धातरि भवत्यनिष्टादपीष्ट मविलंबं॥
पीत्वा विषमपि शंभुर्मृत्युंजयतामवाप तत्कालं २६९

अर्थ- ईश्वर अनुकूल असतां अनिष्टपदार्थापासून देखील इष्टप्राप्ति शीघ्र होते. शंभु हा विषही पिऊन तत्कालींच मृत्युंजयत्वास (मृत्युनाशकत्वास) प्राप्त झाला. २६९॥

ईशः करस्थीकृतकांचनाद्रिः कुबेरमित्रं रजताचलस्थः॥ तथापि भिक्षाटनमस्यजातं विधौ शिरःस्थे कुटिले कुतः श्रीः॥२७०॥

अर्थ- शिव हा सुवर्णपर्वत (मेरु) हस्ताचे ठिकाणीं धारण करणा-

रा व कुबेराचा मित्र असून रजताद्री (कैलास) वर वास्तव्य करीत आहे, तरीही त्यास भिक्षाटन करणेंच प्राप्त झालें. खरेंच आहे, ललाटस्थित 'विधौ' देव (पक्षीं चंद्र) कुटिल (वांकडा) असल्यावर लक्ष्मी कोठली!

असंभवं हेममृगस्य जन्म तथापि रामो लुलुभे मृ-
गाय॥ प्रायः समासन्नविपत्तिकाले धियोऽपि पुं-
सां मलिनी-भवंति २७१

अर्थ—सोन्याच्या हरिणाचें जन्मही संभवत नाहीं. तथापि राम त्या तशा हरिणा विषयीं लोभी झाला. तेव्हां बहुतकरून विपत्ति जवळ येण्याचा काल आला असतां पुरुषांच्या बुद्धीही मलिन होतात. २७१

सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता परो ददातीति कुबु-
द्धिरेषा॥ अहं करोमीति वृथाऽभिमानः स्वकर्म सू-
त्रग्रथितो हि लोकः॥२७२॥

अर्थ—कोणीही सुखाचा किंवा दुःखाचा दाता नाहीं. दुसरा तें देतो अशीजी समजूत ती कुबुद्धि होय. मी करितों हा अभिमान व्यर्थ आहे. कारण सर्वलोक आपआपल्या कर्मरज्जूनेंच सुख दुःखाचे ठायीं गुंफिले आहेत. २७२॥

भ्रमन्वनांते नवमंजरीषु न षट्पदो गंधफलीम-
जिघ्रन्॥ सा किं न रम्या स च किं न रंता बलीयसी
केवल मीश्वरेच्छा॥२७३॥

अर्थ—वनप्रदेशांत नवीन मंजरीवर भ्रमण करणाऱ्या भ्रमरानें चांफ्याच्या कळीस हुंगिलें नाहीं. ह्मणून ती चांफेकळी रमणीय नाहीं काय? तसाच तो भ्रमरही तिच्याशीं रममाण होणारा नाहीं काय? तत्रापि ईश्वरेच्छाच बलवत्तर होय. ॥२७३॥

विधौ विरुद्धे न पयः पयोनिधौ सुधाघसिंधौ न
सुधा सुधाकरे॥ न वांछितं सिध्यति कल्पपाद-
पे न हेम हेमप्रभवे गिरावपि॥२७४॥ ॥श्रीशाम

अर्थ—दैव प्रतिकूळ असतां क्षीरसमुद्रांतही दूध मिळत नाहीं. अमृतसमुद्रांत व अमृतकिरण जो चंद्र त्याचे ठिकाणींही अमृत नाहींसें

होतें. कल्पवृक्षाचे जवळही इच्छा पूर्ण होत नाहीं. किंबहुना मेरुप-र्वतावरही (तो सोन्याचा असून) त्यास सोनें दिसत नाहीं. ॥ २७४॥

क्व नु कुलमकलंकमायताक्ष्याः क्व नु रजनीचरसंगमापवादः॥ अयि खलु विषमः पुराकृतानां भवति हि जंतुषु कर्मणां विपाकः॥ २७५ ॥ श्रीरामः॥

अर्थ- विशालनेत्रा जानकीचें निष्कलंक असें कुल कोणीकडे? आणि तिच्यावर राक्षसाच्या (रावणाच्या) समागमाचा अपवाद कोणीकडे? परंतु उपाय काय? पूर्वी केलेल्या कर्मांचा प्राणिमात्रांवर अति दुःसह परिणाम होतो. हें अगदीं सत्य आहे.

आकाशमुत्पततु गच्छतु वा दिगंतमंभोनिधिं विशतु तिष्ठतु वा यथेच्छं॥ जन्मांतरार्जितशुभाशुभकृन्नराणां छायेव न त्यजति कर्मफलानुबंधः२७६

अर्थ- हा मनुष्य आकाशांत उड्डाण करो, दिगंतापर्यंत जावो, समुद्रांत शिरो, अथवा इच्छेप्रमाणें राहो; परंतु पूर्वजन्मीं संपादित जो शुभ किंवा अशुभ करणारा नरांचे कर्मफलांचा बंध हा छाये प्रमाणें त्यांस सोडीत नाहीं. २७६॥

आसाद्यापि महोदधिं न वितृषो जातो जलेर्वाडवो मेघं प्राप्य न चातकोपि चरणौ भानुं न लेभेऽरुणः॥ चंद्रः शंकर-शेखरेऽपि निवसन् पक्षक्षये क्षीयते प्रायः सज्जन संगतो हि लभते दैवानुरूपं फलम् २७७

अर्थ- वडवाग्नी हा समुद्राकडे जाऊनही अद्यापि त्याच्या पाण्यानें तृषारहित झाला नाहीं. तसाच चातकही मेघाची प्राप्ती होऊन अद्यापि तृषितच आहे. अरुणास सूर्याकडे जाऊन (तो सहस्रपाद असतां) ही अद्यापि दोन पाय मिळाले नाहींत. याच प्रमाणें चंद्र शंकराच्या मुकुटाचे ठायीं रहात असून कृष्णपक्षीं क्षीण होतो. यावरून असें दिसतें कीं, सज्जनाची संगति जरी झाली तरी प्राणी बहुधा आ-

पत्या प्रारब्धाप्रमाणेंच फल पावतो॥ २७७॥

अयममृतनिधानं नायको प्योषधीनां शतभिषग-
नुयातः शंभुमूर्ध्नीवतंसः॥ विरहयति नचैनं राजय-
क्ष्माशशांकं हतविधिपरिपाकः केन वा लंघनीयः २७८

अर्थ- हा चंद्र स्वतः अमृताचा निधि आणि औषधींचाही राजा असून शतभिषजानीं (शंभर वैद्यांनीं, पक्षीं शततारका नक्षत्रानें) युक्त असतां व मृत्युंजय शंकराचे मस्तकावर भूषणही झाला आहे, तथापि त्या चंद्रास क्षयरोग सोडीत नाहीं. खरेंच दुर्दैवाचा परिपाक उल्लंघन करण्यास कोण समर्थ आहे? २७८.

गजभुजंगमयोरपि बंधनं शशिदिवाकरयोर्ग्रहपीड-
नम्॥ मतिमतां च समीक्ष्य दरिद्रतां विधिरहो बले-
वानिति मे मतिः २७९.

अर्थ- हत्ती आणि सर्प यांसही बंधन, चंद्र व सूर्य यांस ग्रह (राहु) पीडा, आणि विद्वान् लोकांस दारिद्र्य हें पाहून प्रारब्धच बलवत्तर आहे अशी माझी समजूत झाली. २७९.

प्रतिकूलतामुपगते हि विधौ विफलत्वमेति बहुसाध-
नता॥ अवलंबनाय दिनभर्तुरभून्न पतिष्यतः करसह-
स्रमपि २८०

अर्थ- दैव प्रतिकूळ झालें असतां पुष्कळ साधनें असूनही विफळ होतात. यास उदाहरण- अस्ताच्या वेळेस समुद्रांत पडणाऱ्या सूर्यास हजार कर (हात पक्षीं किरण) असून देखील कांहीं आश्रय धरण्याला एकही उपयोगीं पडला नाहीं. २८०.

*यस्माच्च येन च यथा च यदा च यच्च यावच्च यत्र च
शुभाशुभमात्मकर्म॥ तस्माच्च तेन च तथा च तदा च
तच्च तावच्च तत्र च विधातृ- वशा दुपैति॥ २८१ ॥

अर्थ- ज्यापासून, ज्याच्या साह्यानें, जसें, जेव्हां, जें, जितकें व जेथें शुभ किंवा अशुभ आपलें कर्म घडलें असेल तें त्यापासून, त्याच्या साह्यानें, तसें तेव्हां, तितकें आणि तेथेंच दैवाच्या नियमाप्रमाणें फलरूपानें त्यास

* अन्वय सरळ.

प्राप्त होतें. २८१

कैवर्तकर्कशकरग्रहणच्च्युतोपि जालांतरे निपतितः शफ-
रो वराकः ॥ दैवात्ततो विगलितो गिलितो बकेन वक्रे
विधौ वद कथं व्यवसाय-सिद्धिः ॥ २८२ ॥ छ ॥

अर्थ- कोळ्याच्या कठोर हातांतून सुटलेला देखील दुर्दैवी मासा जाळ्यांत सांपडला प्रारब्ध योगानें त्यांतूनही मार्गांत गळून पडला परंतु इतक्यांत एका बगळ्यानें झडप घालून त्यास गिळून टाकिलें. खरेंच आहे दैव प्रतिकूळ असतां उद्योगाची सफलता कशी होईल? सांग बरें. २८२॥

सदसि विदुर-भीष्मद्रोण-शारद्वतानां पतिभिरमर-
कल्पैः पंचभिः पालिताऽपि ॥ अहह परिभवस्य द्रौ-
पदी पात्रमासीत् बलवति सति दैवे बंधुभिः किं विधे-
यम् ॥ २८३ ॥

अर्थ- विदुर, भीष्म, द्रोणाचार्य, आणि कृपाचार्य यांच्या सभेंत देवां सारख्या पराक्रमी पांच पतींनीं पालन केलेली अशी ही द्रौपदी हर हर !! पराभव दुःखास पात्र झाली. तस्मात् दैव हें बलवत्तर असतां बंधुजनांनीं काय करावें. २८३.

जामाता पुरुषोत्तमो भगवती लक्ष्मीः स्वयं कन्यका दू-
तो यस्य बभूव कौशिकमुनिर्यज्वा वसिष्ठः स्वयम् ॥
दाता श्रीजनकः प्रदान-समये चैकादशस्था ग्रहाः
किंब्रूमो भवितव्यतां हतविधे रामोपि यातो वने-
म् ॥ २८४ ॥

अर्थ- श्री विष्णु हा जांवाई व स्वतः ऐश्वर्ययुक्त लक्ष्मी ही कन्या होती, विश्वामित्र ऋषि ज्याचा दूत (मध्यस्थ) झाला, वसिष्ठ मुनि स्वतः याज्ञिक करणारे, कन्यादान करणारा जनक व विवाहलग्नीं शुभग्रह एकादशस्थानीं होते. तथापि या नष्ट दैवाची भवितव्यता काय वर्णन करावी कीं ज्याच्यामुळें तो रामही वनवासास गेला!! २८४॥

गीतं कोकिल ते मुदा रसविदः शृण्वंति कर्णामृतं नो
किंचिद्वितरंति ते तरुदले रैवे स्वयं जीवसि ॥ कर्णायु-

हरमुद्गिरंति विरुतं काकास्तेभ्यो बलिं प्रज्ञाएवं
दिशंति हंत धिगिदं वक्रं विधेः क्रीडितम्॥ २८५॥

अर्थ:- हे कोकिलपक्ष्या, रसिक लोक हे कर्णास अमृताप्रमाणें सुखप्रद तुझें गायन प्रीतीनें ऐकतात. परंतु ते तुला कांहीं एक देत नाहींत. तूं झाडांच्या पाल्यावरच स्वतः उपजीविका करितोस. आणि कावळे तर कर्णकटु शब्द करितात. पण शाहाणे लोकच त्यांस बलि देतात. तस्मात् खेदास्पद अशा या देवाच्या विरुद्ध वर्त्तनास धिक्कार असो. २८५॥

तुल्यं भूभृति जन्म तुल्यमुभयोर्मूल्यं च तुल्यं वपुस्तुल्यं
दार्ढ्यमुदग्रटंकदलनं तुल्यं च पाषाणयोः॥ एकस्याखिल-
वंदनाय विधिना देवत्वमारोपितं तद्द्वारे विहितः
परस्य तु पदाघातास्पदं देहली॥२८६॥ ॥श्रीराम्

अर्थ:- दोन्ही पाषाणांचें पर्वतावर जन्म सारखेंच आहे. दोघांचें मूल्य (किंमत) ही सारखेंच आहे. आकृति सारखीच. बळकटपणाही समानच आणि तीक्ष्ण अशा टांक्यांनीं दोघांस सारखेच प्रहार झाले आहेत. तथापि दैवानें एका पाषाणास सर्व लोकांनीं वंदन करण्याकरितां देवत्व दिलें. आणि दुसऱ्याचा, त्या देवाचे द्वारांत सर्व लोकांनीं पाय देण्याकरितां उंबरठा केला. तात्पर्य, सत्कुल, योग्यता, सौंदर्य व विद्याभ्यास हे असूनही जगांत मान्यता दैवानुकूल्यावांचून होत नाहीं. ॥२८६॥

खल्वाटो दिवसेश्वरस्य किरणैः संतापितो मस्तके वां-
छन्देशमनातपं तु विधिना तालस्य मूलं गतः॥ त-
त्राप्यस्य महाफलेन पतता भग्नं सशब्दं शिरः प्रा-
यो गच्छति यत्र भाग्यरहितस्तत्रापदां भाजनं॥२८७

अर्थ:- सूर्याच्या किरणानीं मस्तकाचे ठिकाणीं तप्त झालेला एक टकल्या माणूस. उष्णरहित प्रदेशाची इच्छा करीत दैवयोगानें एका तालवृक्षाच्या मुळाशीं गेला, तों तेथेंही त्या वृक्षाचें विशाळफळ मस्तकांत पडून त्याचें मस्तक भग्न झालें. व तेव्हां मोठा शब्द झाला. तर भाग्यहीन पुरुष जेथें जातो तेथें प्रायः विपत्तीसच पात्र होतो असें जाणावें.॥२८७॥

लक्ष्मीकौस्तुभ-पारिजात सहजः सूनुः सुधांभोनि-
धेर्दैवेन प्रणय-प्रसादविधिना मूर्ध्ना धृतः शंभुना ॥
अद्याप्युज्झति नैव दैव-विहितं क्षैण्यं क्षपावल्लभः
केनान्येन विलंघ्यते विधिगतिः पाषाणरेखासखी

॥ २८८ ॥

अर्थ- लक्ष्मी, कौस्तुभ आणि कल्पवृक्ष यांचा सख्खा बंधु, अमृत समुद्राचा पुत्र व देव जो शंभु त्यानें प्रेमयुक्त प्रसादपूर्वक मस्तकीं धारण केलेला असाही चंद्र दैवयोगानें प्राप्त झालेल्या क्षयरोगापासून अद्यापि मुक्त होत नाहीं. मग दुसऱ्या कोणाच्यानें पाषाणावरच्या रेषेसारखी अचल ही प्रारब्धाची गति उल्लंघन केली जाणार आहे? २८८.

कांतं वक्ति कपोतिका ऽकुलतया नाथांतकालोऽधुना
व्याधोऽधो-धृतचाप-सज्जित-शरः श्येनः परिभ्राम्यति
इत्थं सत्यहिना स दष्ट इषुणा श्येनोपि तेनाहत-
स्तूर्णतौ तु यमालयं प्रति गतौ दैवी विचित्रा गतिः

॥२८९॥

अर्थ- कपोत पक्षीण मोठी व्याकुळ होऊन पतीस म्हणते, हे स्वामी आतां प्राणांत समय प्राप्त जाहला आहे. कारण, खालीं धनुष्य सज्ज करून त्यास बाण जोडून पारधी उभा आहे. आणि हा ससाणा सभोंवतीं घिरट्या घालीत आहे. असें ती बोलत असतां अकस्मात् एक सर्प निघून त्या पारध्यास डसला आणि त्याणें धनुष्यास जोडलेला बाण सुटून नेमका त्या ससाण्यावर गेला या मुळें ते दोघेही (व्याध व श्येन) यमसदनास गेले. व कपोत दंपत्य सुरक्षित राहिले. तेव्हां दैवगति विचित्र आहे. २८९.

यत्र श्यामाक-बीजान्यपि चटक-वधू चंचुकोटिच्युतानि प्रोड्डीयंते स्ववेश्मन्यशन-विरहिते निर्धनेभ्रोंत्रियाणाम्॥ दैवं दातेर्य कस्मात्त्वटल-शिशुकराकृष्टहारावलीतो भ्रष्टास्तत्रैव दृष्टा युवतिभिरलसं घूर्णिता मौक्तिकौघाः २९०

अर्थः- ज्या अन्नलेशाविवर्जित व धनशून्य वैदिक ब्राह्मणांच्या घरीं चिमण्यांच्या चोंचींतून गळून पडलेलीं सांव्याचीं बीजें देखील मुलानीं मला मला ह्मणून उडविलीं जात असत. परंतु दैव देतें झालें तेव्हां एकाएकीं त्याच घरांत लहान मुलांनीं हातीं धरून ओढलेल्या मुक्ताहारांतून गळून पडलेले व त्या तरुणस्त्रियानींहीं आळसानेंच गोळा केलेले मोत्यांचे समूह अवलोकनांत आले!! तस्मात् दैवगति विचित्र आहे. २९०

करस्फोटोंबरत्याग स्तेजोहानिः सरागता॥
वारुणीसंगमावस्था भानुनाप्यनुभूयते २९१

अर्थः- करांचा (किरणांचा पक्षीं हातांचा) स्फोर (नाश पक्षीं फुटणें) अंबराचा (आकाशाचा पक्षीं वस्त्राचा) त्याग. तेजाची हानि आणि आरक्तता ही वारुणीच्या (पश्चिमदिशेच्या पक्षीं मदिरेच्या) समागमाची अवस्था सूर्यही अनुभवीत आहे. २९१.

पततु नभसो गच्छत्वस्तं निमज्जतु वारिधौ व्रजतु वरुणागारद्वारं प्रभाभिरनादृतः॥ तदपि तरणिर्दत्वा पादं शिरःसु महीभृतां दलिततिमिरं प्रातः प्रातः पुनः समुदेष्यति २९२.

अर्थ- सूर्य आकाशांतून पडो, अस्तास जावो, समुद्रांत बुडो, कांतिरहित होऊन वरुणाच्या गृहद्वाराप्रत जावो, तथाऽपि अंधकाराचा समूह नाहींसा करून पर्वतांच्या मस्तकांवर पाय देऊन प्रातःकाळीं पुनः उदयास पावेलच. तात्पर्य- पराक्रमी किंवा तेजस्वी पुरुष आपत्तिग्रस्त झाला व त्या कालांत जरी दुसऱ्याचा त्यानें आश्रय केला तरी तो आपल्या तेजानें किंवा उद्योगानें तेव्हांच त्या विपत्तीस कारणभूत जे शत्रु त्यांचा नाश करून त्वरित उदयास येतो. ॥२९२॥ ॥श्रीशांकरम्

व्यज्यमानकलंकस्य वृद्धौ सत्यां कलानिधेः
आशास्महे वयं पूर्वां सर्वश्लाघ्यां कृशां दशां २९३

अर्थ- वृद्धि झाली असतां ज्याचा कलंक स्पष्ट दिसतो अशा कलानिधीची (चंद्राची किंवा कलावान् मनुष्याची) पूर्वींची, सर्वांस मान्य अशी

कुशलाची दशाच आह्मी इच्छितों. २९३॥

हरमुकुटे सुरतटिनी-निकटस्थिति-लाभतो द्विजेंद्रेण॥ अपि गरलं फणि फूत्कृति रीक्ष्मण-तीक्ष्णाशुशुक्षणिः क्षांतः॥ २९४॥

अर्थ– द्विजेंद्रानें (चंद्रानें पक्षी श्रेष्ठ ब्राह्मणानें) शंकराचे मुकुटावर देवनदी (भागीरथी) च्या सन्निध वास्तव्याचा लाभ झाल्यामुळें विष, सर्पांचा फूत्कार, आणि नेत्रांतील तीक्ष्ण अग्नि देखील सहन केला.' खरेंच आहे. कर्मनिष्ठ ब्राम्हण पाहिजे त्या अडचणी सोसून तीर्थासन्निध वास करितो, असें तात्पर्य. २९४॥

निजकरनिकरसमृद्ध्या धवलय भुवनानि पार्वणशशांक॥ सुचिरं हंत न सहते हतविधिरिह सुस्थितं कमपि॥२९५॥

अर्थ– हे पूर्णिमेच्या पूर्ण चंद्रा, तूं आपल्या किरण समुदायाच्या संपत्तीनें या लोकांस शांत व स्वच्छ कर, कारण हें नष्ट दैव या जगांत चिरकाळ पर्यंत ऐश्वर्यानें स्थिर असलेल्या कोणत्याही प्राण्यास सहन करीत नाहीं.' तात्पर्य, ऐश्वर्य क्षणिक आहे असें जाणून मनुष्य मात्रानें होईल तेवढा परोपकार करीत असावें.' २९५॥

क्षणदृष्टनष्टतडितो निजसंपत्तेः पयोदनिवहेन॥ ज्ञातं साधु यदुचितं भुवनेभ्यो वितरता वारि॥ २९६॥

अर्थ– सर्व जगास उदक देणाऱ्या मेघसमूहानें क्षणोक्षणीं विद्युल्लता उत्पन्न होऊन नष्ट होतात हें जाणून आपल्या संपत्तीचा जो योग्य उपयोग (परोपकार) तो यथार्थ जाणला. ॥२९६॥

अयि जलद यदि न दास्यसि कतिचित्त्वं चातकाय जलकणिकाः॥ तदयमचिरेण भविता सलिलांजलिदानयोग्यस्ते २९७

अर्थ– हे मेघा, तूं जर चातकास 'या वेळेस' कांहीं जलाचे कण देणार नाहींस, तर हा लोकरच तुला तिलांजलि देण्यास योग्य होईल.' तात्पर्य संकटसमयीं थोडका उपकार केल्यानें जो संतोष होतो तोच दुसऱ्यावेळीं

पुष्कळ करूनही निरुपयोगी होतो.'२९७.

नैतां स्वयमुपभोक्ष्यसि मोक्ष्यसि जलदोषरादिषु क्वापि॥ तत्किं तत्र न मुंचसि मुक्ता मुक्ता भवंति यत्रापः॥२९८॥

अर्थ- हे जलदात्या मेघा, तूं या उदकाचा स्वतः उपभोग घेणार नाहींस. आणि आणि उखर प्रदेशांत कोठें तरी वृष्टि करशील त्यापेक्षां जेथें वृष्टि केली असतां मौक्तिकें उत्पन्न होतात, तेथें कां वृष्टि करीत नाहींस? ' तात्पर्य-संपत्तिमान् पुरुषानें दान करणें तें सत्पात्राचे ठिकाणीं केलें असतां सफल होतें.'२९८॥

शोषं गते सरसि शैवलमंजरीणामंतस्तिमिर्लुठति तापविशीर्णदेहः॥ अत्रांतरे यदि न वारिद वारिपूरैराप्लावयेस्तदनु किं मृतमंडनेन॥ ॥२९९॥

अर्थ- सरोवर आटत चालल्यामुळें तापानें तप्त शरीर झालेला मासा शेवाळाचे आंत तळमळत आहे इतक्या अवकाशांत हे मेघा, उदकाच्या प्रवाहानीं जर तूं त्याला शीतळ करणार नाहींस तर पाठीमागून उगीच मृताचें मंडन करून काय उपयोग?' तात्पर्य आर्तास वेळेवर दान केल्यांत जें श्रेय आहे तें ती वेळ निघून गेल्यावर प्राप्त होत नाहीं.'२९९॥

वातैर्विधूनय विभीषय भीमनादैः संचूर्णय त्वमथवा करकाभिघातैः॥ त्वद्वारिबिंदुपरिपालितजीवितस्य नान्यो गतिर्भवति वारिद चातकस्य.३००

अर्थ- हे मेघा, तूं वायूच्या योगानें त्यास कंपित कर. भयकर शब्दांनीं भय दाखीव किंवा गारांच्या प्रहारांनीं चूर्ण कर, परंतु तुझ्या उदकाच्या तुषारानीं जीवन,जीविका पावणारा जो चातक त्यास तुज वांचून अन्य गति नाहीं. ३००

विलपति तृषया सारंगोयं भवानयमुद्यतो जलमपि चेत् संयोगोयं कथंचिदुपस्थितः॥ उपकुरु कुरु प्रह्वचेतो न वेत्सि यदग्रतो जलधर पुनः क्व त्वं क्वायं क-

ते जलबिंदवः ॥ ३०१॥

अर्थ:- हा चातक विलाप करीत आहे तसाच हा तूं उदय पावला आहेस आणि प्रस्तुत तुजजवळ उदकही आहे. हा संयोग कसा तरी (दैव वशात्) प्राप्त झाला आहे तर मन प्रसन्न कर आणि यावर उपकार कर. कारण हे मेघा, पुढें तूं कोणीकडे आणि हा चातक कोणीकडे आणि तुझे जलबिंदु कोणीकडे? असें होईल हें तूं जाणत नाहींस? ३०१॥

कासारेषु सरित्सु सिंधुषु तथा नीचेषु नीरग्रहम्
धिक् तत्रापि शिरोनतिः किमपरं हेयं भवेन्मानिना-
म् ॥ इत्यालोच्य विमुच्य चातकयुवा तेषु स्पृहा मा-
दराद्दुद्रीवस्तव वारिवाह कुरुते धारा-धरा लोकन-
म् ॥ ३०२॥

अर्थ:- नीच अशा सरोवरांचे ठायीं, नद्यांचे ठिकाणीं तसेंच समुद्राचे ठिकाणींही जलग्रहणास धिक्कार असो. कांकीं:- तेथें पाणी घेतानां मस्तक वांकवावें लागतें. आणि अभिमानी लोकांस त्या सारखें दुसरें कांहींच वर्ज्य नाहीं. असा विचार करून तरुण चातक पक्षी त्या सरोवरादिकांचे ठायीं इच्छा न धरून व मान वर करून परम आदरानें हे सजल मेघा तुजकडे पहात आहे. ३०२॥

ये जात्या लघवः सदैव गणनां याता न ये कुत्रचित्
पद्भ्यामेव विमर्दिताः प्रतिदिनं भूमौ विलीनाश्चिर
म् ॥ उत्क्षिप्ताश्च पलाशयेन मरुता पश्यांतरिक्षे
सखे तुंगानामुपरि स्थितिं क्षितिभृतां कुर्वत्यमी पां-
सवः ॥ ३०३॥

अर्थ:- जे जात्याच सर्व काळ हलके, ज्यांची गणनाही कधीं कोणीं केली नाहीं. जे प्रतिदिवशीं पायानींच मर्दन केले जाऊन भूमीचे ठिकाणीं चिरकाळ लीन होतात ते हे रजःकण, चपलांतःकरण अशा वायूनें आकाशांत उडवल्या मुळें उंच उंच पर्वतांवर जाऊन वास्तव्य करीत आहेत. मित्रा, अवलोकन कर. तात्पर्य, हलक्यानांही एकाद्या मोठ्या मनुष्यानें हातीं धरिलें असतां ते मोठ्या पदवीस प्राप्त होतात असें समजावें. ॥ ३०३॥

किं खलु रत्नैरेतैः किं पुनर-भ्रायितेन वपुषा ते ॥ सलिलमपि यन्न तावकमर्णव वदनं प्रयाति तृ-
षितानां ३०४.

अर्थ- हे समुद्रा, या तुझ्या रत्नांचा काय उपयोग? आणि मेघा सारख्या तुझ्या शरीराचें तरी काय फळ? कारण तुझें पाणी देखील तृषितां-चे मुखीं पडत नाहीं. तात्पर्य, श्रीमान् आणि आकृतीनें भव्य असून ज्या-पासून इतरांचा किंचितही उपयोग होत नाहीं त्याची संपत्ति व भव्यता व्यर्थ होय. ३०४

मा कुरु गुरुता-गर्वं लघुरन्यो नास्ति सागर त्वत्तः ॥
जल संग्रहमन्यस्मात् त्वयि संति कुर्वंति पोतस्था:३०५

अर्थ- हे समुद्रा, तूं मोठेपणाचा गर्व धारण करूं नकोस. माझ्या बुद्धीनें तुजपेक्षां हलका कोणी नाहीं. कारण तूं असतानां नौकेंत बसणारे लो-क दुसरे ठिकाणांहून जलाचा संग्रह करतात. तात्पर्य- लहानापासून जें कार्य होतें तें केवळ गर्वानें फुगणाऱ्या थोरापासूनहीं होत नाहीं. ३०५

लघुमय माह न लोकः कामं गर्जंतमपि पतिं पय-
साम् ॥ सर्वमलज्जाकरमिव यत्कुर्वंतीह परिपूर्णाः ३०६

अर्थ- समुद्र पुष्कळ गर्जना करितो तरी त्यास हा जन, लघु (हलका) ह्मणत नाहीं. तस्मात् संपन्न असे थोर गृहस्थ जें कांहीं करतात तें सर्व त्यांनां लज्जेस कारण होत नाहीं. तात्पर्य; हत्तीस ओटाळ कोणी म्हणा[ना] ही म्हण लोकांत आहे त्या प्रमाणें थोरांनीं कांहीं केलें तरी लोक त्यां[ना] नांवें ठेवीत नाहींत. ३०६

अयि रोष मुरीकरोषि नोचेत् किमपि त्वां प्रति वा-
रिधे वदामः ॥ जलदेन तवार्थिना विमुक्तान्यपि तो-
यानि महान्नहो जहासि ॥ ३०७ ॥

अर्थ- हे समुद्रा, तूं जर रागावणार नाहींस तर तुझ्याशीं आह्मी कांहीं एक भाषण करतों. तें असें कीं, अरे तूं इतका मोठा असून तुझा याच-क जो मेघ त्याणें सोडलेलीं उदकें देखील घेण्यास आळस करीत नाहीं-स. तात्पर्य- संग्रहशील पुरुष पाहिजे त्या पासून वस्तूंचा संग्रह करितात.
३०७

आदाय वारि परितः सरितां मुखेभ्यः किं तावदर्जि-
त-मनेन दुरर्णवेन ॥ क्षारीकृतं च वडवादहने हुतं
च पाताल-कुक्षिकुहरे विनिवेशितं च ॥ ३०८ ॥ ७

**अर्थः**— या दुष्ट समुद्रानें चहूंकडून नद्यांच्या प्रवाहांतून उदकाचा संग्रह करून काय मिळविलें? एक तर तें सर्व पाणी खारें करून टाकलें, व वडवाग्नीचे ठिकाणीं जाळून टाकिलें आणि कांहीं पाताळाचे विवरांत घातलें! तात्पर्य- कांहीं मनुष्यास सर्व ठिकाणच्या वस्तूंचा आपल्या जवळ संग्रह करावा अशी बुद्धि असते; परंतु संगृहीत वस्तूंचा योग्य उपयोग न होतां अपव्यय झाल्यास तो संग्रह करून निष्फळ होतो. ॥३०८॥

अयं वारामेको निलय इति रत्नाकर इति श्रितो-
स्माभिस्तृष्णा तरलित मनोभिर्जलनिधिः ॥ क एवं
जानीते निजकरपुटी-कोटर-गतं क्षणादेनं ताम्य
त्तिमि-मकर-मापास्यति मुनिः ३०९

**अर्थः**- हा उदकांचा अद्वितीय सांठा आहे म्हणून आणि रत्नांची खाण आहे म्हणून तृषेनें चंचळ चित्त होऊन आम्ही समुद्राचा आश्रय केला परंतु असें कोणास माहित आहे कीं,- अगस्त्य मुनि, आपल्या करपात्रांत घेतल्यामुळें ज्यांतील मत्स्य व मकर ग्लान झाले आहेत अशा या समुद्रास क्षणांत पिऊन टाकील!! ३०९॥

ग्रावाणो मणयो हरिर्जलचरो लक्ष्मीः पयोमानुषी
मुक्ता याः सिकताः प्रवाल-लतिकाः शैवालमंभः सु-
धा ॥ तीरे कल्पमहीरुहाः किमपरे नाम्नाऽपि रत्नाकरो
दूरे कर्ण-रसायनं निकटतस्तृष्णाऽपि नो शाम्यति ३१०

**अर्थः**- रत्नें हे दगड, विष्णु जलचर, लक्ष्मी जलमानुषी, मोत्यें ही वाळू, पोंवळ्यांच्या वेली तें शेवाळें, अमृत हें पाणी, तटावर कल्पवृक्ष, दुसरें काय सांगावें? त्याचें नांवही रत्नाकर, परंतु हें सर्व दुरूनच कानास गोड लागणारें आहे. जवळ जाऊन पाहिलें तर तेथें तृषेची शांतिही होत नाहीं. तात्पर्य, दुरून डोंगर साजरे!! ३१०॥

एतस्मादमृतं सुरैः शतमखेनोच्चैःश्रवाः सद्गुणः हृ-

घोनाद्भुत-विभ्रमैक-वसतिर्लक्ष्मीः समासादिता ॥ इ-
त्यादि-प्रचुराः पुरातनकथाः सर्वेभ्य एवश्रुता अस्मा-
भिर्नच दृष्टमत्र जलधौ मिष्टं पयोऽपि क्वचित् ॥ ३११

**अर्थः-** या समुद्रापासून देवानीं अमृत, इंद्रानें सद्गुणी उच्चैःश्रवा नांवाचा घोडा, कृष्णानें अद्भुत विलासांचें स्थानच अशी लक्ष्मी संपादन केली. इत्यादि पुष्कळ जुन्या गोष्टी सर्वांपासूनच ऐकल्या आहेत; परंतु आम्हीं तर या समुद्रांत गोडें पाणी देखील कधीं पाहिलें नाहीं. तात्पर्य, कांहीं गोष्टी लोकप्रसिद्धी वरून फार महत्वाच्या वाटतात; परंतु स्वतः अनुभवानें पाहूं लागलें म्हणजे त्यांत पुष्कळ अंतर दिसतें. ॥ ३११

आघ्रातं परिलीढमुग्र-नखरैः क्षुण्णं च यच्चर्वितं क्षि-
प्तं यद्भुवि नीर-सत्व-कुपिते नेति व्यथां मा कृथाः ॥ हे स-
द्रत्न तवैतदेव कुशलं यद्वानरेणादरादंतः सारविचा-
रण व्यसनिना चूर्णीकृतं नाश्मना ॥ ३१२ ॥ श्रीशम् ॥

**अर्थः-** हे श्रेष्ठ रत्ना, जें, वानरानें तुला हुंगिलें, चाटिलें, तीक्ष्ण नखांनीं कुरतुडिलें आणि चावून पाहिलें. नंतर नीरस आहे असें पाहून टाकून दिलें. त्यामुळें तूं मनांत दुःख करूं नकोस. तुझें हेंच भाग्य समज कीं, यांत सारभूत काय आहे याचा विचार करण्याचे नादानें आदरपूर्वक पाषाणाचा प्रहार करून या वानरानें तुझें चूर्ण केलें नाहीं. तात्पर्य, अरसिकांनीं अवज्ञा केल्यामुळें गुणीलोकांनीं खिन्न होऊं नये. ॥ ३१२ ॥ श्रीशं

ध्वनिरति मधुरः शुक्लिम मुच्चैर्जनिरपि शंख नदीन-
तस्तवाभूत ॥ अवगत मखिलं बहिः सितत्वं कुटिल-
तरं पुनरंतरं न विद्मः ३१३

**अर्थः-** हे शंखा, तुझा ध्वनि अति मधुर, शुभ्रता अतिशय, जन्मही समुद्रापासून झालें आहे. या प्रमाणें तुझें सर्व बाह्य स्वच्छत्व आम्हांस समजलें परंतु तुझें अंतर अत्यंत कुटिल आहे हें मात्र आम्ही जाणत नाहीं. तात्पर्य, बाहेरील दाक्षिण्यावरून अंतःकरणाचें अनुमान चुकीचें होतें. ३१३ ॥

क्वांभोधौ जन्म क्वच वपुरिदं कुंदधवलं क्वचो

वासस्थानं कृतं महेह विष्णोः करतलं ॥ क्वनीचानामा-
स्येपरिणतिरियं चुंबनविधावितीवायं शंखः करुण-
करुणं रोदिति मुहुः ३१४.

अर्थ—समुद्राचे ठिकाणीं जन्म कोणीकडे हें कुंदपुष्पाप्रमाणें शुभ्र असें श-
रीर कोणीकडे? निवासस्थान केलेलें विष्णूचें करतळ (तळहात) कोणी-
कडे? आणि नीचांच्या (जंगमादिकांच्या) मुखांचे ठिकाणीं राहणें हा परि-
णाम कोणीकडे? असा विचार करूनच कीं काय हा शंख चुंबन करितांना
अतिशय दीन स्वरानें रुदन करीत आहे! तात्पर्य; कुल, सौंदर्य, व महदाश्रय
असूनही प्राक्तनानुरूप सुखदुःख चुकत नाहीं. ३१४.

तातः क्षीर-निधिः स्वसा जलधिजा भ्राता सुरेशद्रुमः सौजन्यं सह कौस्तुभेन शशिना यस्य द्विजेशादपि ॥ धिक्कर्माणि स एव कंबुरधुना पाखंड-कांताकरे विश्रांतः प्रतिवासरं प्रतिगृहं भैक्ष्येण कुक्षिंभरिः॥३१५॥

अर्थ:-क्षीरसमुद्र ज्याचा पिता, लक्ष्मी बहीण, कल्पवृक्ष बंधु, कौस्तुभ र-
त्नाबरोबर मैत्री, आणि चंद्रापेक्षांही शुद्धता आहे, तोच शंख प्रस्तुत पा-
खंडी (जंगम) लोकांच्या स्त्रियांचे हातांत विश्रांति घेत प्रतिदिवशीं घरो-
घर भिक्षाटन करून पोट भरितो. तस्मात् पूर्वार्जित कर्मांना धिक्कार अ-
सो. ३१५॥

कस्य तृषं न क्षपयसि पिबति न कस्तव पयः प्रविश्यांतः॥ यदि सन्मार्गसरोवर नक्रो न क्रोडमधिवसति॥३१६॥

अर्थ:-हे सन्मार्गातील सरोवरा, जर नक्र (सुसर) तुझ्या उदरांत रहात
नसता तर तूं कोणाची तृषा शांत न करतेंस. व आंत प्रवेश करून तु-
झें उदक कोण न पितें; तात्पर्य, एकाद्या संस्थानांत किंवा राज्यांत दुर्ज-
न मनुष्य व्यवस्थापक असल्यास गुणी लोकांस तेथून कांहीं लाभ हो-
त नाहीं. ३१६.

आपेदिरेऽबरपथं परितः पतंगा: भृंगा रसाल-मुकुला-

नि समाश्रयंति ॥ संकोच मंचेति सरस्त्वयि दीने-दीनो
मीनो नु हंत कतमां गतिमभ्युपैतु ॥ ३१७ ॥ श्रीशम्

अर्थ- हे हंस आदिकरून पक्षी सभोंवतीं आकाशमार्गास गेले. भ्रमर हे आम्रवृक्षांच्या कळ्यांचा आश्रय करतात; परंतु हे सरोवरा, तूं आटून गेल्यावर अतिदीन हा मत्स्य कोणत्या गतीस प्राप्त होईल बरें? तात्पर्य, थोर लोकांना विपत्ति प्राप्त झाली तरी त्याणीं आपल्या वांचून अनन्य गतिक जे लोक आहेत त्यांची काळजी बाळगणें हें न्याय्य आहे. ३१७॥

क्रौंचः क्रीडतु कूर्दतां च कुररः कंकः परिष्वज्य तां
मद्गुर्माद्यतु सारसश्च रसतु प्रोड्डीयतां टिट्टिभः ॥
भेकाः संतु बकावसंतु चरतु स्वच्छंद मांडिस्तटे हंहो
पद्मसरः कुतः कैतिपये-हंसैर्विना श्रीस्तव ॥ ३१८

अर्थ- क्रौंच (करकोंचा) पक्षी क्रीडा करो, कुरर (जलपक्षी) खेळो, गृध्रपक्षी तुला आलिंगन करो, पाणकावळा उन्मत्त होवो, सारसपक्षी शब्द करो, टिटवा इकडे तिकडे उड्डाण करो, बेडूक असोत, बगळे तुझे ठिकाणीं राहोत, बगळी काठीं स्वच्छंदानें भ्रमण करो. परंतु हे कमलयुक्त सरोवरा, कांहीं तरी हंस तुझे ठिकाणीं असल्या वांचून तुला शोभा कोठून असणार? तात्पर्य सर्व प्रकारचें ऐश्वर्य व भृत्यवर्ग असून त्यांत सदसद्विवेचन करणे जे विद्वान् त्यांचा समावेश जर नाहीं तर तें विशोभित होय ३१८॥

यातेमय्यचिरान्निदाघमिहिरज्वालाशतैः शुष्कतां गं-
ता कं प्रति पांथसंततिरसौ संतापमालाकुला ॥ एवं
यस्य निरंतराधिपटलैर्नित्यं वपुः क्षीयते धन्यं जीवन-
मस्य मार्गसरसो धिग् वारिधीनां जनुः ॥ ३१९ ॥ श्रीशं

अर्थ- मी ग्रीष्मऋतूंतील सूर्याच्या प्रखर किरणांनीं लौकरच शुष्कतेस पावल्या नंतर संतापानें व्याकुळ झालेला हा पांथजनांचा समुदाय कोणाकडे जाईल? या प्रमाणें निरंतर काळजीच्या योगानें ज्याचें शरीर नेहेमीं क्षीण होतें, त्या या मार्गांतील सरोवराचें जीवित सफल होय. या समुद्राचे

जन्मास धिक्कार असो. कांकीं, नेहेमीं जळपूर्ण असून ज्याचा एक बिंदु-ही तृषितांच्या मुखीं पडत नाहीं. ॥ तात्पर्य, साधारण श्रीमान् असू-न थोर मनाच्या पुरुषा पासून जसा जगास उपयोग होतो तसा मोग श्रीमान् असूनही मनाचा हलका अशा पासून होत नाहीं. ॥ ३१९ ॥ छ ॥

यद्यपि बहुगुणगम्यं जीवनमेतस्य कूप-मुख्यस्य।
जयेति तथापि विवेको दानं पात्रानुमानेन ॥ ३२० ॥

अर्थ- या श्रेष्ठ कूपाचें जीवन ( पाणी पक्षीं उपजीविका साधन धन ) जरी पुष्कळ गुणानें ( दोरानें पक्षीं विद्यागुणानें ) प्राप्त होतें तरी याचे ठिकाणीं पात्रा प्रमाणें दान करणें हा विचार उत्तम आहे. तात्पर्य, पात्र विचार न करितां पुष्कळ जरी दान केलें तरी तें पात्रापात्र-विचार पूर्वक मितदानाची योग्यता पावत नाहीं. ३२०

नितरां नीचोस्मीति त्वं खेदं कूप मा कदापि कृथाः ॥
अत्यंत-सरस हृदयो यतः परेषां गुणग्रहीतासि ३२१

अर्थ- हे कूपा, तूं 'मी अतिशय नीच आहें म्हणून' खेद कधींही करूं-नकोस. कारण तूं अत्यंत सरस हृदयाचा असून दुसऱ्याचे गुण ग्रहण करणारा आहेस. तात्पर्य, रसिक व गुणज्ञ मनुष्य नीच कुळांत किंवा वि-पन्न स्थितींत असला तरी तो सर्वांस मान्य असतो. ॥ ३२१ ॥

छाया फलानि मुकुलानि च यस्य विश्व माल्हादयं-
ति सहकार महीरुहस्य ॥ आमृष्य तस्य शिखया न-
वपल्लवानि मथ्नासि रे दव-हुताश हताश कष्टम् ३२२

अर्थ- हे दुष्टा, दावानला, ( वणव्या ) ज्याची छाया फळें, व तुरे जगास आनंद देतात त्या आम्रवृक्षाच्या नव्या पालवीस ज्वालेनें स्पर्श करून मथन करितोस हें फार वाईट आहे. तात्पर्य, ज्याची संगति, संपत्ति व-कीर्ति यांचे योगानें हरप्रकारें लोक सुख पावतात अशा सज्जन मनु-ष्याचे शरीरवल्लीस अल्पवयांतच हा कालाग्नि होरपळून टाकतो, ही गोष्ट मोठ्या दुःखाची आहे. ३२२ ॥

तेजांसि यस्य प्रशमं प्रयांति वारां प्रवाहेण सवन्हि रन्यः ॥ अयं पुनर्वाडव नामधेयः समुद्र मापीय बिभर्ति तेजः ॥३२३॥

अर्थ- ज्याचें तेज उदकांच्या प्रवाहें करून शांत होतें तो अग्नि वेगळा, परंतु हा वडवाग्नि समुद्रास प्राशन करून तेज धारण करितो. तात्पर्य- शत्रूंस पाहतांच विरघळून जाणारे शूर पुष्कळ असतात. परंतु जो शत्रूंचा पराभव करून ख्याति मिळविणारा शूर तो मात्र प्रशंसेस पात्र होय ॥३२३॥

एकेन राजहंसेन या शोभा सरसो भवेत् ॥ न सा बक सहस्रेण परितस्तीर-वासिना ॥३२४॥ श्रीशो

अर्थ- एका राजहंसाचे योगानें सरोवरास जी शोभा प्राप्त होते, ती सभोंवतीं तटावर वास करणारे हजारों बगळ्यांनीं प्राप्त होत नाहीं. तात्पर्य- कुलास एका सत्पुत्रानें जशी शोभा येते तशी पुष्कळ कुपुत्रांनीं येत नाहीं.

नीरक्षीर विवेके हंसालस्यं त्वमेव कुरुषे चेत् ॥ ॥ विश्वस्मिन्नधुना ऽन्यः कुलव्रतं पालयिष्यति कः ३२५

अर्थ- हे हंसा, तूंच पाणी आणि दूध यांचें विवेचन (पृथक्करण) करण्याविषयीं जर आळस करशील तर आतां या जगांत दुसरा कोण कुलाचें व्रत पालन करील? तात्पर्य- थोर लोक जसें आचरण करतात तसेंच करण्यास इतर जन अनुसरतात ही गोष्ट मनांत आणून श्रेष्ठ लोकांनीं आपलें सदाचरण कधींही सोडूं नये. ३२५

गांग-मंबु सितमंबु यामुनं कज्जलाभ मुभयत्र मज्जतः ॥ राजहंस तव सैव शुभ्रता चीयते न च नचापचीयते ॥३२६॥

अर्थ- गंगेचें पाणी स्वच्छ (शुभ्र) आहे. आणि यमुनेचें उदक काजळा सारखें काळें आहे, परंतु हे राजहंसा, तूं दोन्ही ठिकाणीं अवगाहन करीत असतां तुझी तीच शुभ्रता आहे, ती कांहीं अधिक होत नाहीं व न्यूनही होत नाहीं. तात्पर्य, उभय प्रतिपक्ष्यांच्या कांहीं कृत्यांत शुद्ध मनाचा मध्यस्थ अ-

सत्य ह्मणजे तो दोघां पैकीं कोणाचा पक्षपात धरीत नाहीं. यामुळें त्याची-शत्रुता तशीच राहते. ३२६

> अंभोजिनीवन-विलासन मेवं हंतुं हंसस्य हंतु नि-
> तरां कुपितो विधाता॥ नत्वस्य दुग्धजल भेदविधि-
> प्रसिद्धां वैदग्ध्य कीर्तिमपहर्तु-मसौसमर्थः॥ ३२७॥

**अर्थ-** अत्यंत क्रुद्ध जाहलेला ब्रह्मदेव हंसाचा कमल वनांतील विहार मात्र नाहींसा करील तर करो. परंतु त्याची दूध व पाणी भिन्न करण्याच्या योगानें प्रसिद्ध झालेली चातुर्याची कीर्ति नाहींशी करण्यास तो ब्रम्ह-देव समर्थ नाहीं. तात्पर्य- संपत्ति व ऐश्वर्य हें क्षणिक असल्या मुळें दैववशात् नाहींसें झालें तरी स्वतःची विद्वत्ता, व तन्मूलक कीर्ति यांचा नाश कधींही होत नाहीं. ३२७.

> रे राजहंस किमिति त्वमिहा गतोसि यो सौ बकः स
> इह हंस इति प्रतीतः॥ तद्गम्यतां-मनुपदेन पुनः स्व-
> भूमौ यावद्वदंति न बकं खलु मूढ-लोकाः॥ ३२८॥

**अर्थ-** हे राजहंसा, तूं येथें कशाला बरें आला आहेस? कारण जो हा बगळा आहे तो येथें हंस म्हणून प्रसिद्ध झाला आहे. तस्मात् जों पर्यंत हे मूर्ख लोक तुला बगळा म्हणत नाहींत तोंच तूं मागच्या पायानीं पुनः स्वस्थानीं जावेंस. तात्पर्य- कुग्रामांत वास करणारा विद्वान्ही मूर्खांत गणाला जातो. ३२८॥

> कस्त्वं रोहित-लोचनास्य-चरणो हंसः कुतो मानसा-
> त् किं तत्रास्ति सुवर्ण-पंकज वनान्यंभः सुधासन्नि-
> भम्॥ रत्नानां निचयाः प्रवाल-मणयो वैडूर्य रोहः
> केचित् शंबूकाः किमु संति नेति च बकै राकर्ण्य ही-
> हीकृतं ३२९

**अर्थ-** कांहीं बगळे एकत्र असतां तेथें एक राजहंस आला त्यास बगळे विचारतात, नेत्र, मुख आणि चरण या ठिकाणीं आरक्त वर्ण असा तूं कोण-आहेस? हंस म्हणतो, मी हंस आहें. बगळे- कोठून आलास? हंस, मा-

नससरोवरापासून. **बगळे**— तेथें काय आहे? **हंस**— सुवर्णकमलांचीं व- नें, अमृता सारखें उदक, रत्नांचे समूह, पोंवळीं व कोठें वैडूर्य मणीही आहेत. **बगळे**— तेथें गोगलगायी आहेत काय? **हंस**— नाहींत. **बगळे**—अ- सें ऐकून ही ही असा उद्गार काढून हंसले. **तात्पर्य**— मूर्खसमाजांत वि- द्वान् गेला ह्मणजे वरील हंसा प्रमाणें उपहास पावतो. ॥ ३२९॥

**यः संतापमपाकरोति जगतां यश्चोपकारक्षमः सं- वेषाममृतात्मकेन वपुषा प्रीणाति नेत्राणि यः॥ त- स्याप्युन्नतिमंबुदस्य सहसे यन्न त्वमेतावता वर्णे- नैव परं मराल धवलः कृष्णश्चरित्रेरसि॥ ३३०॥ ७॥**

**अर्थ**— जो जगाचा संताप नाहींसा करतो आणि जो परोपकारा विषयीं स- मर्थ आहे, जो अमृतमय अशा आपल्या शरीरानें सर्वांच्या नेत्रांस आनंद दे- तो त्या तशाही मेघाची उन्नति (उदय) तूं ज्या पेक्षां सहन करीत नाहींसत्या पेक्षां हे हंसा, तूं एवढ्या रंगाचे योगानेंच स्वच्छ आहेस; परंतु आचरणा- नीं मलिन आहेस. तात्पर्य.— परोपकारी व सर्वाल्हादकारक अशा सत् पुरुषांचा द्वेष करणारा मत्सरी मनुष्य बाह्यतः कितीही शुद्धता दाखवी- त असला तरी त्याची ती द्वेषबुद्धीच त्याच्या मात्सर्ययुक्त मनाची मलिनता प्रदर्शित करित्ये. ३३०.

**अपसर मधुकर दूरं परिमलबहुलेऽपि केतकीकु- सुमे॥ इह नहि मधुलवलाभो भवति परं धूलि- धूसरं वदनं ३३१.॥**

**अर्थ**- हे भ्रमरा, तूं दूर मागें सर; कारण सुगंधानें भरलेल्याही या केतकी- च्या पुष्पांचे ठिकाणीं लेशमात्र मकरंदाचा (पुष्परसाचा) लाभ होणार ना- हीं. केवळ तोंड मात्र धुळीनें भरून पांढरें होईल. तात्पर्य.- धनवान् अ- सून कृपण अशा मनुष्याकडे गेलेल्या याचकास त्या पासून धनप्राप्ति हो- त नाहीं. इतकेंच नाहीं तर त्याच्या दुर्वाक्यानें अपमान झाल्यामुळें मुखा- वर म्लानताही येते. ३३१.

**येनामंदमरंदे दलदरविंदे दिनान्यनायिषत॥ कु- टजे खलु तेनेहा तेनेहो मधुकरेण कथम्॥ ३३२॥**

अर्थ:- ज्या भ्रमरानें मकरंदपूर्ण अशा विकासित कमलावर राहून दिवस घालविले त्या भ्रमरानेंच कुड्याच्या झाडाविषयीं इच्छा कशी केली ? अरेरे,! हें वाक्य कोणी आपली सुखाची स्थिति सोडून मुद्दाम दुःखप्रद स्थितींत गेलेल्या मनुष्यास लक्षून आहे. ३३२.

अमरतरु-कुसुम-सौरभ सेवनसंपूर्णकामस्य ॥
पुष्पांतरसेवेयं भ्रमरस्य विडंबना महती ॥ ३३३

अर्थ:-कल्पवृक्षाच्या फुलांचा सुगंध ग्रहण करून तृप्त झालेल्या भ्रमरास हें अन्य पुष्पांचें सेवन मोठें उपहासास्पद होय. तात्पर्य स्पष्ट आहे. ३३३.

इह रूपमात्रसारे चित्रगते कनककल्हारे ॥ नरसो नापि च गंधो मधुकर बंधो मुधा-भ्रमसि ॥ ३३४

अर्थ:- केवळ दिसण्यांत मात्र सुरेख अशा या चित्रांतील सुवर्णकमलाचे ठिकाणीं रस नाहीं आणि गंधही नाहीं असें असून हे बाप्पा भ्रमरा, तूं उगाच भ्रमांत पडला आहेस. तात्पर्य अंतर्भाव न जाणतां आकारावरूनच एखाद्या मनुष्याच्या नादीं लागणें निरर्थक होय. ३३४.

मलिनेऽपि रागपूर्णा विकसित-वदना-मनल्प-जल्पेऽपि ॥ त्वयि चपलेऽपि च सरसां भ्रमर कथं वा सरोजिनीं त्यजसि ३३५.

अर्थ:- हे भ्रमरा, तूं मलिन असतांही तुझ्यावर प्रीति ठेवणारी, तूं पुष्कळ जल्पना करीत असतांही विकसित मुख करणारी, तूं चंचल असतांही तुजविषयीं उत्सुक अशा या कमलिनीस कसाबरें सोडतोस? ही कवीची उक्ति विषयलंपटपणानें पतिव्रता स्त्रीचा त्याग करणाऱ्या मनुष्यास अनुलक्षून आहे. ३३५.

नंदनजन्मा मधुपः सुरतरु-कुसुमेषु पीत-मकरंदः
दैवादवनिमुपेतः कुटजे कुटजे समीहते वृत्तिम्
॥ ३३६ ॥

अर्थ:- कल्पवृक्षाच्या फुलांतील मकरंद सेवन करणारा नंदनवनांतील भ्रमर प्रारब्ध योगानें पृथ्वीवर येऊन प्रत्येक कुड्याचे झाडाचे ठि-

कार्णी उपजीविकेची इच्छा करीत आहे. तात्पर्य- कुलीन व ऐश्वर्यवान् असाही मनुष्य संपत्तीचा पुष्कळ उपभोग करून शेवटीं दुर्दैवानें आपद्ग्रस्त जाहला असतां देशांतरास जाऊन घरोघर भ्रमण करून उपजीविका करतो. ३३६॥

दूरतया स्थूलतया नीलतया दानलोलुपैर्मधुपैः॥
भ्रामितमिभराजधिया हंतासौ दंततो महिषः॥३३७

अर्थ- दानोदक प्राशनाविषयीं लंपट अशा भ्रमरांनीं दूर असल्या मुळें मोठेपणावरून आणि काळेपणावरून हा हत्तीच आहे अशा बुद्धीनें भ्रमण केलें परंतु शेवटीं तो रेडा आहे असें सिद्ध झालें. तात्पर्य कांहीं सादृश्या वरून कोणाविषयीं कोणाची जी भावना झाली असते ती त्याचा निकट सहवास झाल्यावर नाहींशी होऊन खरें स्वरूप बाहेर पडतें३७

रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं भास्वानुदेष्यति हसिष्यति पंकजश्रीः॥ इत्थं विचिंतयति पद्मगते द्विरेफे हा मूलतः कमलिनीं गजउज्जहार॥
॥ ३३८ ॥

अर्थ- 'आतां रात्रि जाईल, पहांट होईल, सूर्य उगवेल आणि मग कमलाची शोभा विकसित होईल.' कमलांत अडकलेला भ्रमर याप्रमाणें विचार करीत असतां हर हर! एक गज येऊन त्यानें ती कमलिनी मुळापासून उपटून टाकिली!! तात्पर्य- मनुष्य संकटांतून मुक्त होण्या विषयीं अनेक प्रकारें मनाच्या युक्ति कल्पीत असतो. परंतु दैवानुकूल्य नसल्यास त्या युक्तीनीं तो मुक्त होत नाहीं इतकेंच नाहीं, तर पुनः मुक्तीची आशाही नाहीं अशा स्थितींत पडतो.

ये वर्धिताः करिकपोलमदेन भृंगाः प्रोत्फुल्लपंकजरजः सुरभी-कृतांगाः॥ ते सांप्रतं प्रतिदिनं क्षपयंति कालं निंबेषु चार्ककुसुमेषु च दैव-योगात्॥३९

अर्थ- प्रफुल्लित झालेल्या कमलांच्या रजांनीं सुगंधित शरीर झालें जे भ्रमर हत्तींच्या गंडस्थलांतील दानोदकानें वृद्धीस पावले तेच सांप्र-

नकाळीं दैवयोगानें निंबांच्या झाडांवर आणि रुईच्या फुलांवर प्रतिदिवशीं काळक्षेप करतात. तात्पर्य स्पष्टच आहे.

आजन्म कल्पतरुकाननकामचारी यत्कौतुकादुपगतः कुटजं मिलिंदः॥ तत्कर्मणः सुसदृशं फलमेतदेवं यत्प्राप साम्यमधुना मधुमक्षिकाभिः॥३४०॥

अर्थ- जन्मापासून कल्पवृक्षांच्या अरण्यांत संचार करणारा भ्रमर ज्यापेक्षां मौजेनें कुड्याच्या झाडावर गेला त्यापेक्षां त्याच्या त्या कर्मास हेंच योग्य फल आहे कीं, आतां तो मधमाशांचें साम्य पावला आहे. तात्पर्य- मनुष्य हा आपली पूर्वस्थिति सोडून अविचारानें अन्यस्थितींत जाईल तर त्या योगानें त्यास नीचता प्राप्त होते. ३४०

मागा विषादमलिपोतक केतकीनामंतर्निगूढमनवाप्य मधुप्रकर्षम्॥ लाभः स एव परमो ननु कंटकानां श्रेणीभिरक्षतशरीर-तया प्रयासि॥३४१॥ श्रीशाम्

अर्थ- हे भ्रमर बालका, केतकींच्या आंत गुप्त असलेला मकरंद तुला मिळाला नाहीं यामुळें तूं खेदास प्राप्त होऊं नकोस. कारण कांट्यांच्या पंक्तींनीं तुझ्या शरीरास कांहीं जखम न होतां तूं सुखरूप बाहेर जातो आहेस हाच खरोखर परम लाभ आहे. तात्पर्य- दुर्जनांत जाऊन आपला नाश करून न घेतां येणेंच कठिण आहे. ३४१.

गंधे रोत्या जगति विदिता केतकी स्वर्णवर्णा पुष्पभ्रांत्या क्षुधित-मधुपः पुष्पमध्ये पपात॥ अंधीभूतस्तदनु रजसा कंटकैश्छिन्नपक्षः स्थातुं गंतुं क्षणमपि सखे नैव शक्तो द्विरेफः॥३४२॥ श्रीशां.

अर्थ- सुगंधानीं युक्त सोनेरी रंगाची केतकी जगांत प्रसिद्ध आहे म्हणून क्षुधातुर झालेला भ्रमर, पुष्प अशा भ्रांतीनें केतकीच्या कणसावर पडला. हे मित्रा नंतर केतकीच्या धुळीनें तो अंधवत् झाला आणि कांट्यानीं त्याचे पंख तुटले. अर्थात तो भ्रमर क्षणभरही तेथें राहण्यास किंवा तेथून जाण्यास समर्थ झाला नाहीं. अयोग्य स्थानीं लाभाचे आशेनें गेल्यास मनुष्या-

स पुनः निर्गम होणेंही कठिण पडतें. ३४२॥

निरानंदः कौंदे मधुनि विधुरो बालबकुले रसालेऽसा-
लंबो लवमपि लवंगे न रमते॥ प्रियंगौ नासंगं रच-
यति न चूतेऽपि रमते स्मरंल्लक्ष्मीलीला-कमल-म-
धुपानं मधुकरः॥३४३॥

**अर्थ**:- कुंदपुष्पांतील मकरंदाचे ठिकाणीं आनंदरहित. कोमल अशा बकुल-पुष्पांविषयीं विमुख, आम्रवृक्षाचे ठायीं असा-लंब (आश्रय न करणारा) असा हा भ्रमर लवंग पुष्पाचे ठिकाणीं क्षणभरही रममाण होत नाहीं. प्रियंगु (गहुला) पुष्पाचे ठिकाणीं सक्त होत नाहीं. किंबहुना लक्ष्मीचें लीला-भुवन जें कमल त्यांतील मधुपानाचें स्मरण करतानां तो आंब्याच्या मोहरा विषयींही प्रीति करीत नाहीं. तात्पर्य:- मनाची प्रीति ज्या ठिकाणीं असते त्याचा वियोग होऊन अन्यपदार्थ त्या पेक्षां विशिष्ट ही प्राप्त झाले तरी तें त्या ठिकाणीं रमत नाहीं. ३४३.

श्रियो वासांभोजे त्रिदिवसरिदंभोजकुहरे हरेर्ना-
भ्ये पद्मे मधु मधुकरोयः किल पपौ॥ सदैवो-दुर्मील
त्तपनकरताप-व्यतिकर-व्यथाकंपः संप्रत्य-तरु मेरुभू-
मौ विचरति॥३४४॥

**अर्थ**:- जो भ्रमर लक्ष्मीचें निवासस्थान जें कमल त्या ठिकाणीं, भागीरथीचे उदकांतील कमलाचें अभ्यंतरीं आणि विष्णूचे नाभिकमलांत मकरंद प्राशन करिता झाला. तोच भ्रमर दैवयोगानें प्रखर होणाऱ्या सूर्याच्या किरणांचा ताप लागतांच दुःखानें कंपायमान होत्साता सध्यां निर्वृक्ष जी मारवाड देशांतील जमीन तिजमध्यें फिरत आहे. तात्पर्य:- मनुष्याची स्थिति दैवयोगानें थोड्याच काळांत अगदीं विलक्षण होऊन जाते॥३४४॥

यस्याः संगमवांछया न गणिता वाप्यो विनिद्रोत्पल-
ला यामालिंग्य समुत्सुकेन मनसा यातः परां निर्वृ-
तिम्॥ भग्नां तामवलोक्य चंदनलतां भृंगेण यज्जी-
व्यते धैर्यं नाम तदस्तु तस्य न पुनः स्नेहानुरूपं फलं ४५

**अर्थ**:- जिचा समागम व्हावा या इच्छेनें प्रफुल्लित कमलांनीं युक्त अशा वा-

पी (विहिरी) गणिल्या नाहींत, उत्सुक मनानें जिला आलिंगन करून जो परमानंदास प्राप्त जाहला. ती चंदन वृक्षावरील वेली भग्न झाली हें पाहून तो भ्रमर अद्यापि जिवंत आहे हें त्याचें धैर्य असो. परंतु तें त्याच्या प्रीतीचें योग्य फल नव्हे. तात्पर्य दंपत्यांत जिवंतपणीं जें एकमेकां विषयीं प्रेम असतें त्याची सत्यता दोघांतून एकाचा नाश झाला असतां व्यक्त होते. ३४५

प्रारंभे कुसुमाकरस्य परितो यस्योल्लसन्मंजरीपुंजे
मंजुलगुंजितानि रचयं स्तानातनोरुत्सवान्॥ तस्मि-
न्नद्य रसालशाखिनि दशां दैवात्कृशामंचति त्वंचेन्
मुंचसि चंचरीक विनयं नीचस्त्वदन्योस्तिकः॥ ४६॥

**अर्थ:**- हे भ्रमरा, वसंतऋतूच्या आरंभीं ज्याच्या सभोंवतीं प्रफुल्लित झालेल्या मंजरींच्या (तुऱ्यांच्या) समूहावर मंजुल गुंजारव करीत अनेक उत्सव करीत होतास तो आम्रवृक्ष प्रारब्ध योगानें कृशदशेस प्राप्त झाला असतां तूं जर त्यावरची पूज्यत्वबुद्धि सोडशील तर तुजहून दुसरा नीच कोण आहे? तात्पर्य; ज्यावर उपजीविका करून सर्व जन्म घालविलें तो मनुष्य संकटांत असतां त्यास अगदीं विसरणें हें नीचाचें कर्म होय. ॥ ३४६॥

कोकिलोहं भवान् काकः समानः कालिमावयोः ॥
अंतरं कथयिष्यंति काकलीकोविदाः पुनः॥ ३४७॥

**अर्थ:**- कोकिल कावळ्यास म्हणतो,– मी कोकिल आहें. आणि तूं कावळा आहेस. तुझा आणि माझा काळेपणा सारखाच आहे. परंतु स्वरमाधुर्य जाणते लोक, तुझ्यांत आणि माझ्यांत काय अंतर आहे तें सांगतील. तात्पर्य आकृतीवरून सारखेपणा असला तरी विद्याही त्या दोघांत मोठाच भेद उत्पन्न करिते. ३४७॥

कलकंठ यथा शोभा सहकारे भवद्गिरः॥ खदिरे
वा पलाशे वा किंतथा स्याद्विचारय॥ ३४८॥ श्रीशं

**अर्थ:**- हे कोकिलपक्ष्या, तुझ्या या कोमल वाणीची शोभा जशी आंब्याच्या झाडावर आहे तशी खैरावर किंवा पळसावर दिसेल काय? याचा तूंच विचार कर. तात्पर्य; कांहीं गोष्टी आश्रयाच्या महत्वानें शोभतात. त्यांचें स्था-

नांतर जाहलें असतां ती शोभा रहात नाहीं. ३४८॥

**तावत् कोकिल विरसान् यापय दिवसान् वनांतरे निवसन् ॥ यावन्मिलदलिमालः कोपि रसालः समुल्लसति॥३४९॥**

**अर्थ**-हे कोकिलपक्ष्या, तों पर्यंत तूं दुसरे वनांत राहून हे विरस दिवस घालीव. जोंपर्यंत भ्रमरमालांनीं परिपूर्ण असा एखादा आम्रवृक्ष प्रफुल्लित होईल. तात्पर्य—गुणी मनुष्यानें गुणज्ञाचा आश्रय मिळे पर्यंत उदासीन न होतां कालक्रमणा करावी. कालगत्या तसा आश्रय मिळाल्यास सर्व दुःखाचें परिमार्जन एका क्षणांत होईल. ३४९॥

**रेरे कोकिल माभज मौनं किंचिदुदंचय पंचमरागं नोचेत्त्वामिह को जानीते काककदंबकपिहितेचूते ५०**

**अर्थ**- अरे कोकिल पक्ष्या, तूं मौन धारण करूं नकोस. कांहीं तरी पंचमराग प्रकट कर. नाहीं तर या कावळ्यांच्या समुदायानीं आच्छादित केलेल्या आंब्याच्या झाडावर तुला कोण बरें ओळखील? तात्पर्य— जो गुणी मनुष्य मुखदौर्बल्यामुळें आपला गुण प्रकट करीत नाहीं तो अविद्वानांतच गणला जातो. ३५०॥

**दात्यूहाः सरसं रसंतु सुभगं गायंतु केकाभृतः कोदंबाः कलमालपंतु मधुरं कूजंतु कोयष्टयः॥ दैवाद्यावदसौ रसाल-विटपिच्छायामनासादयन् निर्विण्णः कुटजेषु कोकिलयुवा संजात-मौनव्रतः॥३५१**

**अर्थ**-हा,आंब्याची दाट छाया न मिळाल्या कारणानें खिन्न झालेला तरुण कोकिल दैवयोगानें जों पर्यंत कुड्याच्या झाडावर मौनव्रत धारण करून आहे, तों पर्यंत चातकपक्षी सुरस शब्द करोत. मयूर सुंदर गायन करोत. पाणकोंबडे कोमल आलाप करोत. कोयष्टि (कोंदेपक्षी) मधुर आवाज करोत. तात्पर्य— मोठ्या योग्यतेचा पुरुष कांहीं संकटामुळें अप्रसिद्ध असतां नीच वर्गांतील मनुष्यें मनमानेल तशी प्रतिष्ठा मिरवितात.

**अंभोजप्रकरोऽथ केतककुलं कुंदोत्करः कैरवव्रातो मल्लिगणोऽथ चंपकचयो जातीसमूहोऽथवा॥नो-**

चेदादरमातनोति पिकने खेदं वृथा माकृथा यस्मा-
त्क्वापि कदापि कोपि भविता यस्त्वद्गुणान् ज्ञास्यति
॥ ३५२ ॥

अर्थ- हे कोकिला, कमलांचा समुदाय, केतकीचें बन, कुंदपुष्पांचा समूह, चंद्रविकासि कमलांचा जमाव, मोगऱ्यांचा संघ, चंपक पुष्पांचा संचय आणि जाईचा समुच्चय, हे तुझा आदर जर करीत नाहींत तर त्या विषयीं तूं व्यर्थ खेद करूं नकोस. कारण कोठें तरी कधीं तरी कोणी तरी असा उत्पन्न होइल कीं, जो तुझ्या गुणांस जाणेल. तात्पर्य, अनभिज्ञ लोकांनीं अनादर केल्या वरून विद्वान् लोकांनीं खेद मानूं नये. ३५२

एक एव खगो मानी चिरंजीवतु चातकः॥ म्रियेत
वा पिपासायां याचते वा पुरंदरं॥ ३५३॥ श्रीशं

अर्थ- एकच अभिमानी पक्षी चातक चिरंजीव होवो. कारण जो तहानेंनच मरतो अथवा इंद्रास याचना करतो. तात्पर्य- अभिमानी मनुष्यास यांचा करणें हें मरणापेक्षां दुःखप्रद वाटतें. ३५३॥

चातक धूमसमूहं दृष्ट्वा माधाव वारिधर बुद्ध्या ॥
इह हि भविष्यति भवतो नयनयुगादेव वारिणां पूरः॥ ३५४॥

अर्थ- हे चातकपक्ष्या, धुराचा लोट पाहून हा मेघ आहे अशा बुद्धीनें धांवूं नकोस. कारण येथें (धुरांत) तुझ्या नेत्रद्वयापासूनच उदकाचा पूर उत्पन्न होईल. तात्पर्य- दाता अशा बुद्धीनें कृपण मनुष्याची उपार्जना करणारास फार दुःख होतें. ३५४

रक्ताब्जपुंजरजसा ऽरुणितान् विमुच्य स्वच्छान् सुधासमरसानपि वारि-राशीन्; यच्चातकः पिबति वारिधरोद-बिंदून् मन्ये तदा-नतिभयाच्छिरसो ऽभिमानी५५

अर्थ- आरक्तवर्ण कमलसमुदायाच्या रजांनीं किंचित तांबूस झालेले स्वच्छ अमृता सारखे असेही जलाशय सोडून अभिमानी चातक मेघानें सोडलेल्या उदकाचे बिंदूच जें पितो तें मस्तक नम्र करण्याच्या भयानें पितो. असें मला वाटतें. तात्पर्य- मानी मनुष्यास उपार्जनेनें व आपलें दैन्य दा-

खचून पुष्कळ द्रव्य मिळाल्यापेक्षां आपला मान व योग्यता राहून थोडें जरी मिळालें तरी तें त्यास फार संतोषास कारण होतें. ५५

बीजैरंकुरितं लताभिरुदितं वल्लीभि रुज्जृंभितं कंदैः कंदलितं जनैः प्रमुदितं धाराधरे वर्षति ॥ श्रीतश्चातक पातकं किमपि ते संभाव्यहे जानीमहे येनास्मिन्न पतंति चंचुपुटके त्रिाः पयो-बिंदवः ५६

अर्थ- मेघ वृष्टि करीत असतां बीजांस अंकुर फुटले, वेली उगवल्या, औषधी टवटवीत झाल्या, कंद वृद्धिंगत झाले आणि लोकांना फार आनंद होऊं लागला आहे; परंतु बाप्या चातका, तुझें कांहीं तरी पाप आहे तें आम्हांस चांगलेंसें समजत नाहीं, कीं ज्या मुळें तुझ्या या चोंचीचे आंत दोन तीन देखील थेंब पडत नाहींत. तात्पर्य— दाता हा जरी सम बुद्धीनें सर्वांस देत असला तरी याचकांच्या लाभकाळा प्रमाणें त्यांस प्राप्त होतें. या करितां आपल्या अल्प-लाभामुळें दात्यास दोष देणें योग्य नाहीं. ५६

अन्ये ते जलदायिनो जलधरास्तृष्णां विनिघ्नंति ये भ्रातश्चातक किं वृथा विरुदितैः खिन्नोसि विश्राम्यताम् मेघः शारद एव काशधवलः पानीय रिक्तोदरो गर्जत्येव हि केवलं भृशतरं नो बिंदुमप्युज्झति॥ ॥ ५७॥

अर्थः- हे बाप्या चातका, तुझ्या तृषेचा नाश करितात ते उदकाची वृष्टि करणारे मेघ वेगळे; ओरडून उगाच कां श्रमी झाला आहेस? विश्रांति घे. कारण कांशाप्रमाणें पांढरा, ज्याच्या उदरांत पाण्याचा लेश नाहीं असा हा शरदृतूंतला मेघ केवळ गर्जना मात्र भयंकर करीत आहे परंतु एक थेंब सुद्धां सोडणार नाहीं. तात्पर्य— बाह्य डामडोलावरून किंवा वाक्पांडित्यावरून कोणी मनुष्य कोणाचे नादीं लागतो परंतु परिणामीं त्यापासून इच्छा पूर्ण न झाल्यास पश्चात्ताप पावतो. ॥५७॥

यः कृष्णं कुरुते मुखं जनयति त्रासं तडिद्भिस्तु यो यश्च प्रार्थयते परं दलयति श्रोत्रं निजे गर्जितैः॥ सं-

त्वं चातक तं तथा विधमपि भ्रांतस्त्वया याचता जीमूतं हंतमेवं तुल्यमनयो रर्थित्व-तिर्यक्त्वयोः॥ ५८॥

अर्थ:- जो आपलें मुख काळें करितो, तसेंच जो विजांच्या योगानें भय उत्पन्न करितो. एकास देण्या करितां दुसऱ्यास याचना करितो, आणि आपल्या गर्जनानीं कान ठाळ्या बसवितो; बाप्पा चातका, त्या नशाही मेघास याचना करणाऱ्या त्वां खरोखर या तुझ्या याचकपणास आणि पक्षित्वास योग्य असेंच हें कृत्य (मेघयाचन) केलेंस. तात्पर्य,— याचकास पाहतांच तोंड लपवणारा, किंवा त्यास भय उत्पन्न करणारा, धर्माच्या मिषानें लोकांपासून द्रव्य संपादक आणि आत्मश्लाघी अशा मनुष्यापासून द्रव्याची आशा करणारा केवळ पशूच होय. ५८

अस्मान्विचित्र वपुषस्तव पृष्ठ-लग्नान् कस्मान्विमुंचति भवान् यदि वा विमुंच॥ रे नीलकंठ गुरुहानि रियं तवैव मौलो पुनः क्षितिभृतो भविता स्थितिर्नः॥५९

अर्थ:- हे नीलकंठ (मयूरा), तूं तुझ्या पाठीशीं संलग्न असलेल्या व चमत्कारिक शरीराच्या आम्हांस (पिसांस) कशामुळें सोडतोस? अथवा सोड बापडा, ही तुझीच हानि आहे. आमचें काय! आह्मी राजाच्या मस्तकावर (मोरचेलाचे रूपानें) जाऊन बसूं. तात्पर्य,— चतुर आणि सभ्य अशा आश्रितांचा कारणावांचून त्याग केला असतां त्यास कांहीं एक न्यूनता न येतां उलट स्वामीच मात्र निंद्यनेस पात्र होतो. ॥५९॥ ६०॥

एतस्मिन्मलयाचले बहुविधैः किंतैरकिंचित्करैः कोकोलककपोत कोकिलकुलैरेकोपि पार्श्वे स्थितः॥ केकी कूजति चेत् नदाविघटितव्यालावलीबंधनः सेव्यः स्यादिह सर्वलोकमनसा मानंदनश्चंदनः ६०

अर्थ:- या मलय पर्वतावर, निरुपयोगी अनेक प्रकारचीं कावळे, दिवाभीत, कपोत आणि कोकिल यांचीं कुलें आहेत यांस काय करावयाचें आहे? हा बाजूस असलेला एकटाही मोर जर केकारव करील तर सर्व लो-

कांच्या मनांस आनंद करणारा हा चंदन वृक्ष सर्पसमूहाच्या बंधनापासू-
न मुक्त होऊन येथील सर्व जनांस सेवन करण्यास योग्य होईल. तात्प-
र्य;– जगांत अनेक लोक आप आपले सामर्थ्या प्रमाणें विवक्षित वि-
षयांवर वाक्पांडित्य करतात. परंतु ज्याच्या संभाषणानें सर्व लोकांचें नि-
वासस्थान असा देश सर्पा सारख्या क्रूर राजपाशांतून मुक्त होऊन स-
र्व जनांस स्वसत्तेनें सेवनीय होईल तोच एक वक्ता होय॥ ६०॥ छ॥ छ

केका कर्णामृतं ते सकुसुमकबरी कांतिहाराः कलापाः
कंठच्छाया पुरारेर्गलरुचिरुचिरा सौहृदं मेघसंघैः
विश्वद्वेषि द्विजिव्हस्फुरदुरुपिशितैर्नित्यमाहारवृत्तिः
कैः पुण्यैः प्राममेतत्सकलमपि सखे चित्रवृत्तं मयूर ६१

अर्थ– हे मित्रा मयूरा, तुझा शब्द (केकारव) कर्णांस अमृता सारखा म-
धुर, पिसें स्त्रियांच्या पुष्पयुक्त केशपाशांचें सौंदर्य हरण करणारीं, गळ्या-
ची कांति शंकराच्या कंठवर्णा सारखी सुंदर, मेघसमुदायाशीं सख्य आ-
णि जगाचे द्वेष्टे जे सर्प त्यांच्या मांसाचा आहार या प्रमाणें सगळेंच हें
चमत्कारिक वर्तन कोणत्या पुण्यानीं तूं संपादन केलेंस! तात्पर्य;– वा-
णींत माधुर्य, शरीराचे ठिकाणीं सौंदर्य, थोराशीं मैत्री, आणि परपीडकां-
चा नाश करण्याचें सामर्थ्य या गोष्टी पुण्यावांचून एकत्र रहात नाहींत॥६१

अस्तं गतोयमरविंदवनैकबंधुर्भास्वान् न लंघयति
कोपि विधिप्रणीतं॥ हे चक्र धैर्यमवलंब्य विमुंच
शोकं धीरास्तरंति विपदं न तु दीनचित्ताः॥ ६२॥छ

अर्थ;– हे चक्रवाका, हा कमलवनाचा अद्वितीय बांधव सूर्य अस्तास गे-
ला आहे, कारण ब्रह्मदेवानें केलेला नियम कोण उल्लंघन करितो! तर आ-
तां तूं धैर्य धरून शोकाचा त्याग कर. कारण धैर्यवान् लोकच विपत्ती-
स तरतात. दीनता मनांत बाळगणारे विपत्तींतून पार पडत नाहींत. ता-
त्पर्य स्पष्टच आहे॥ ६२॥

अखिलेषु विहंगेषु हंत स्वच्छंदचारिषु॥ शुक

पंजरबंधस्ते मधुराणां गिरां फलम् ॥६३॥

अर्थ- सर्व पक्षी स्वच्छंदानें फिरत असतां हे शुका, (पोपटा) तुला हें पिंजऱ्यांत बंधन प्राप्त झालें आहे. तें तुझ्या मधुर वाणीचें फळ होय. तात्पर्य, गुणवान् गुणज्ञांच्या समूहांत गेला असतां त्याचें तेथून निघणें बहुधा होत नाहीं. ६३

सुभाषितस्याध्ययनानुसक्तं शुकं वराकाः प्रहसंति कोकाः॥ तमेव संसत्सु गिरं किरंतं दृष्ट्वा भवंति त्रपया नतास्याः ६४॥

अर्थ- हे क्षुद्र कावळे सुभाषिताच्या अध्ययनांत सक्त असलेल्या राघूस हंसतात, परंतु सभेंत मंजुल वाणी बोलतानां त्यासच पाहून लज्जेनें मुख खालीं घालतात. तात्पर्य-एखादा मुलगा विद्येचा व्यसनी असून निरंतर अभ्यासांत निमग्न असलेला पाहून इतर टवाळ टारगीं मुलें त्याची थट्टा करितात परंतु विद्वत्तेच्या योगानें तो मोठ्या योग्यतेस चढल्यावर मग त्यांनां आपण केलेल्या उपहासाचा पश्चात्ताप होऊन भूमिनिरीक्षणच करावें लागतें. ६४

अमुष्मिन्नुद्याने विहगखल एष प्रतिकलं विलोलः काकोलः क्वणति खलु यावत् कटुतरं ॥ सखे तावत् कीर द्रढय हृदि वाचोऽपि सकला न मौनेन न्यूनो भवति गुणभाजां गुण-गणः॥६५॥

अर्थ- हे मित्रा पोपटा, त्या बागेंत सर्व पक्ष्यांत नीच व चंचल हा डोमकावळा प्रतिक्षणीं अति कठोर असें जों पर्यंत ओरडत आहे तों पर्यंत तूं हृदयाचे ठिकाणीं आपली सगळी मंजुळ वाणी बळकट धर. कारण गुणी लोकांचा गुणसमुदाय मौनाच्या योगानें उणा होत नाहीं. ६५॥७

वासः कांचन पंजरे नृपकराम्भोजैस्तनू-मार्जनं भक्ष्यं स्वादुरसाल-दाडिम-फलं पेयं सुधाभं पयः॥ पाठः संसदि रामनाम सततं धीरस्य कीरस्य मे हा हा हंत तथापि जन्मविटपि क्रोडं मनो धावति॥ ६६॥

अर्थ:- बुद्धिमान् अशा मज पोपटास सोन्याच्या पिंजऱ्यांत राहणें, राजाच्या कमळा सारख्या मृदु हातांनीं शरीराचें क्षालन, स्वादिष्ट आणि रसभरित अशा डाळिंबाचें भक्षण, अमृतासारख्या मधुर व स्वच्छ उदकाचें पान, आणि सभेंत सर्वकाळ रामनामाचा पाठ असें परम दुर्लभ व महत्वाचें ऐश्वर्य या राजवाड्यांत जरी आहे तरी माझें मन झाडावरील ज्या घरट्यांत माझें जन्म झालें तिकडेच धांव घेतें. तात्पर्य;- देशांतरीं मोठें ऐश्वर्य मिळून सुखानें कालक्रमणा होत असली तरी जन्मभूमीची उत्कंठा नाहींशी होत नाहीं. ६६.

तुल्यवर्णच्छदः कृष्णः कोकिलैः सह संगतः ॥ केन विज्ञायते काकः स्वयं यदि न भाषते ॥ ६७॥

अर्थ:- कोकिलांच्या पंखा प्रमाणें ज्याचे पंख, रंगानें काळा असून कोकिळां बरोबर असणारा कावळा हा स्वतां जर कांहीं भाषण न करील तर कोणाच्या ओळखीस येईल? तात्पर्य.- मूर्ख लोकांनीं पंडित सभेंत प्रवेश केल्यास मौनव्रत दृढ धरावें ह्मणजे त्यांचें स्वरूप (मौर्ख्य) ख्यापन होत नाहीं. ६७.

विधिरेव विशेषगर्हणीयः करट त्वं रट कस्तवापराधः सहकारतरौ चकार यस्ते सहवासं सरलेन कोकिलेन ६८

अर्थ:- हे कावळ्या, तूं कर्णकठोर असें खुशाल ओरड. तुझा काय अपराध आहे? या संबंधानें ब्रह्मदेवाचीच विशेष निंदा केली पाहिजे. कीं ज्याणें आंब्याच्या वृक्षावर सरल अशा कोकिला बरोबर तुझा सहवास केला आहे. तात्पर्य;- कुलीन असून मूर्ख आणि वाचाळ अशा मनुष्याचें भाषण ऐकून कंटाळा जरी आला तरी त्यास तो दोष देऊं नये तर सत्कुलांत मौर्ख्य आणि वाचालत्व या विरुद्ध वस्तूंचा संयोग करणाऱ्या ईश्वराचीच लीला मनांत आणून समाधान करावें. ६८

प्रत्यंगणं प्रतितरु प्रतिवारितीरं काकाश्चरंति चल-चंचुपुटा रटंतः ॥ नोयांति तृप्तिमथ मंडित पुंडरीक खंडे वसन्नहह तृप्यति राजहंसः॥ ॥ ६९॥

अर्थ:- चंचळ चोंचीचे हे कावळे ओरडत प्रत्येक अंगणांत, प्रतिवृक्षा-

वर आणि प्रत्येक किनाऱ्याचे ठिकाणीं भ्रमण करितात. परंतु त्यांची तृप्ति होत नाहीं. आणि राजहंस सुशोभित अशा कमलवनांत राहूनच तृप्त होतो. तात्पर्य:- संतोषी मनुष्याची तृप्ति थोडक्या लाभानेंही होते. या मुळें त्यांना विशेष हव्यास न होतां सुखप्राप्ति होते आणि असंतोषी मनुष्य जन्मभर फिरला व त्यास अनेक लाभही झाले तरी त्याची तृप्ति होत नाहीं. या मुळें त्यास स्वस्थतेचें सुख मरेपर्यंतही मिळत नाहीं. ॥ ६९ ॥ ७

कृष्णं वपुर्वहतु चुंबतु सत्फलानि रम्येषु संवसतु चूतवनांतरेषु ॥ पुंस्कोकिलस्य चरितानि करोतु कामं काकः कलध्वनिविधौ ननु काक एव ॥ ७० ॥

अर्थ:- कावळा, नीलवर्ण शरीर धारण करो, चांगल्या फळांस चुंबन देवो, रमणीय अशा आम्रवनांत वास्तव्य करो, किंबहुना कोकिळांचें सर्व आचरण यथेच्छ आचरो परंतु कोमळ असा पंचमस्वर उच्चारते वेळीं कावळा तो खरोखर कावळाच. तात्पर्य- कित्येक अक्षरशत्रु लोक वेषादिकांनीं विद्वान मनुष्याच्या सभेस जाऊं पाहतात परंतु खऱ्या विचाराचा प्रसंग आला ह्मणजे त्यांचें मूळचें स्वरूप बाहेर पडतें. ॥ ७० ॥

बंधं लब्धवतः परस्य वदनं भिक्षाशया पश्यतः स्वावासच्युतिवेदनां विदधतः कांतां विना सीदतः ॥ भ्राम्यंतः सह भार्यया प्रतिदिशं प्रत्यापगं प्रत्यगं कीरस्याध्ययनं हसंति विविधक्रीडारसा वायसाः ॥ ७१ ॥ ७ ॥

अर्थ:- स्त्रीसह वर्तमान प्रतिदिशेस, प्रतिनदीस आणि प्रत्येक वृक्षावर भ्रमण करणारे अनेक क्रीडा करण्या विषयीं उत्सुक असे कावळे; पिंजऱ्यांत बंध पावणारा, भिक्षेच्या आशेनें दुसऱ्याचें मुख पाहणारा, स्वस्थानापासून भ्रंश झाल्यामुळें दुःखी होणारा आणि प्रिय पत्नीच्या वियोगानें ताप पावणारा जो पोपट त्याच्या अध्ययनास हंसतात. तात्पर्य- वेदशास्त्रादि विद्या शिकून लोकांची याचना करणारा; घर, स्त्री सोडून प्रवासरसिक होणारा व पारतंत्र्यरूप बंधनांत सांपडणारा अशा विद्वानापे-

क्षां आपल्या कुटुंबांत राहून स्वतंत्रपणानें निर्वाह करणारा मूर्खही श्रेष्ठ होय. ॥७१॥

नेभ्रूभस्फुरणं न चंचुचलनं नो चूलिकाकंपनं न ग्रीवाचलनं मनागपि नयत्पक्षद्वयोत्क्षेपणम् ॥ नासाग्रेक्षणमेकपादगमनं कष्टैकनिष्ठंपरं यावत्तिष्ठति मौनहीन वदन स्तावद्बकस्तापसः ॥ ७२ ॥ श्रीशम्

अर्थ– भिवयांचे ठिकाणीं स्फुरण नाहीं, चोंचीस चांचल्य नाहीं, डोकीवरचे केशाही हालत नाहींत, मानेचे ठिकाणीं चलन नाहीं, पंखांस थोडीही हालचाल नाहीं, नासाग्राचे ठायीं दृष्टि, मोठ्या श्रमानें एका पायांवर चालणें ह्या सर्व लक्षणांनीं युक्त बगळा त्याच्या तोंडांत जोंपर्यंत मासा सांपडला नाहीं तोंपर्यंतच तपस्वी आहे. तात्पर्य,– दांभिक लोक खऱ्या पेक्षांही अधिक आचार दाखवितात परंतु त्यांस लाभालाभाचे प्रसंग आले ह्मणजे त्यांचे ढोंग उघडकीस येतें. ७२॥

घनसंतमसमलीमस-दशादिशि निशियद्विराजसितदन्यत् ॥ कीटमणे दिनमधुना तरणिकरांतरितासित किरणाम् ॥७३

अर्थ– हे काजव्या, जीचे ठायीं दशदिशा निबिड अंधकारानें व्याप्त आहेत अशा रात्रीं तूं जें चकाकतोस तें वेगळें; परंतु आतां ज्यांत सूर्यकिरणांनीं चंद्र देखील निस्तेज होतो असा दिवस आहे. तात्पर्य,– अल्पगुणी लोकांची ख्याति मूढ लोकांत होते ह्मणून त्याणीं महाविद्वत्सभाजांत तिची आशा करणें निरर्थक होय. ७३॥

नाभिषेको न संस्कारः सिंहस्य क्रियते वने विक्रमार्जितसत्त्वस्य स्वयमेव मृगेंद्रता ७४

अर्थ– सिंहास राज्याभिषेक नाहीं, किंवा कांहीं संस्कारही कोणी करीत नाहीं. परंतु अरण्यांत स्वपराक्रमानें सर्व श्वापदांस वश करणाऱ्या त्यास मृगराजत्व स्वतः सिद्धच आहे. तात्पर्य,– स्वभाव-शूरपुरुषास आपले आपणच लोक वश होतात. त्यानां दुसरें कांहीं लागत नाहीं.

एकाकिनि वनवासिन्यराजलक्ष्मण्यनीतिशास्त्रज्ञे
सत्त्वोच्छ्रिते मृगपतौ राजेति गिरः परिणमंति ॥७५॥

**अर्थ.**– एकाकि, वनांत राहणारा, राजचिन्ह (चामरादि) विरहित नीतिशास्त्रांत मूढ असूनही शौर्यानें अधिक अशा सिंहाचे ठिकाणीं राजा अशा शब्दांची योजना होते. तात्पर्य– राज्यकर्त्यास सहाय, पत्तन, छत्र, चामरें हीं अंगभूत साधनें आहेत. परंतु पराक्रम हें मुख्य साधन होय. ७५॥ ७६

जठर-ज्वलन-ज्वलताऽप्यपगत शंकं समागताऽपि पुरः॥ करिणा मरिणा हरिणा हरिणाली हन्यतां नु कथं॥७६

**अर्थ**– जठराग्नीनें तप्त जाहलेल्याही गजांतक सिंहानें निर्भयपणें पुढें आलेलाही मृग समूह कसा बरें मारावा? तात्पर्य.– महा पराक्रमी पुरुषास क्षुद्र लोकांचा पराभव करणें देखील लज्जास्पद वाटतें. ॥७६

आबद्ध कृत्रिम सटा जटिलांसभित्तिरारोपितो मृगपतेः पदवीं यदि श्वा॥ मत्तेभ कुंभ तटपाटन लंपटस्य नादं करिष्यति कथं हरिणाधिपस्य॥७७

**अर्थ.**– बांधलेल्या कृतीच्या जटानीं ज्याचा स्कंधप्रदेश व्यास केला आहे असा कुत्रा सिंहाच्या ठिकाणीं जरी बसविला तरी मदमत्त गजांच्या गंडस्थळांचें भेदन करण्या विषयीं उत्सुक अशा मृगराजाची गर्जना तो कसा करील? तात्पर्य.– अंगांत गुण नसून बाह्य उपचारानीं त्या गुणांचा आव घातला तरी खरी परीक्षा पाहण्याची वेळ आली ह्मणजे ते उपचार फिके पडतात. ॥७७॥

पिब स्तन्यं पोत त्वमिह मददंतावलधिया दृगंतानाधत्से किमिति हरिदंतेषु परुषान्॥ त्रयाणां लोकानामपि हृदयतापं परिहरन्नयं धीरं धीरं ध्वनति नवनीलो जलधरः॥७८

**अर्थ.**– सिंहीण आपल्या मुलास ह्मणत्ये हे बालका, तूं उगाच स्तनपान-

कर· त्या दिशांच्या प्रांतभागांचे ठिकाणीं मत्त गजेंद्र आहे अशा बुद्धीनें कठोर असे नेत्रकटाक्ष फेंकतोस? 'अरे वेड्या, हा गज नव्हे,' तर नवीन उत्पन्न झालेला ह्मणून अत्यंत निळ्या रंगाचा हा जगतास जीवन देणारा मेघ तिन्हीही लोकांच्या हृदयांतील ताप निवारण करीत मंद मंद गर्जना करीत आहे. तात्पर्य, स्वभावतः शूर अशा पुरुषांस शत्रूची परोक्ष गर्जनाही सहन होत नाहीं, मग समक्ष कोठून सहन होणार? ३७८

लोकानंदन चंदनद्रुम सखे नास्मिन् वने स्थीयतां
दुर्वंशैः परुषैरसारहृदयैराक्रांतमेतद् वनम् ॥
ते ह्यन्योन्यनिघर्षजातदहन ज्वालावलीसंकुला
न स्वान्येव कुलानि केवलमिदं सर्वं दहेयुर्वनम् ॥३७९

**अर्थ-** लोकांस आनंद देणाऱ्या हे मित्रा चंदनवृक्षा, त्या वनांत तूं राहूं नयेस. कारण हें अरण्य निःसारहृदयाचे व कठोर अशा दुष्ट बांबूनीं व्यापून टाकिलें आहे. ते हे बांबू परस्परांच्या संघर्षणामुळें उत्पन्न झालेल्या अग्नीच्या ज्वालांचे समूहानीं वेष्टित होऊन केवळ आपल्याच कुळांस ( सर्व बांबूंस ) जाळतील असें नाहीं तर या सगळ्या वनास जाळून भस्म करितील. ३७९ तात्पर्य- दुष्टसंगतीस राहिलेल्या सज्जनांस केव्हां तरी तो सहवास संकटांत पाडणार.

मूलं भुजंगैः शिखरं विहंगैः शाखाः प्लवंगैः कुसुमानि भृंगैः ॥ नास्त्येव तच्चंदनपादपस्य यन्नाश्रितं सत्वभरैः समंतात् ॥३८०॥

**अर्थ-** चंदनवृक्षाचें मूळ ( बुडखा ) सर्पानीं आश्रय केलें आहे, त्याचें शिखर पक्ष्यानीं आश्रित आहे, शाखा वानरानीं आणि पुष्पें भ्रमरानीं वेष्टिलीं आहेत. यावरून प्राणिसमूहानीं चहूंकडून व्यापिलें नाहीं असें चंदनवृक्षाचें कोणतेंही अंग नाहीं. तात्पर्य- चंदनाचे सर्व अवयव ) मूळ, शेंडा, फांद्या, फुलें, आणि गंध हे सर्व लोकांच्या उपयोगीं पडतात, त्याप्रमाणेंच सज्जनाचे विद्या, वित्त, आदिकरून सर्व गुण परोपकारास कारणभूत असल्यामुळें सर्व लोक त्यांचा आश्रय करून राहतात. ३८०

औदार्यं भुवनत्रयेऽपि विदितं संभूतिरंभोनिधेर्वा-
सो नंदनकानने परिमलो गीर्वाणचेतोहरः॥ एवं
दातृगुणोत्करः स्फुरतरोः सर्वोऽपि लोकोत्तरः स्याद-
र्थिप्रवरार्थितार्पणविधावेको विवेको यदि॥३८१॥

**अर्थ**- कल्पवृक्षाचें औदार्य साऱ्या त्रिभुवनांतही प्रसिद्ध आहे. जन्म क्षीरसमुद्रांतून, वास्तव्य नंदननांवाच्या इंद्राच्या उद्यानांत, सुगंध देवांच्याही मनास आकर्षण करणारा, या प्रमाणें कल्पवृक्षाच्या दाते पुरुषांस विशेष शोभादायक अशा गुणांचा हा उत्कर्ष जर त्यास याचकानीं इच्छिलेले पदार्थ देण्याचे कामीं एक विचार असता तर तो सर्वच खरोखर लोकोत्तर होता. तात्पर्य- औदार्य, सद्वंश, पत्तनवास, कीर्ति हे सर्व गुण सद्विचारावांचून फिके भासतात. ॥३८१॥

अंतःप्रतप्तमरुसैकतदह्यमान-मूलस्य चंपकतरोः
क्व विकाशचिंता॥ प्रायो भवंत्यनुचितस्थितिदेशभा-
जां श्रेयः स्वजीवपरिपालनमात्रमेव॥३८२॥ ७॥

**अर्थ**- आंतल्या भागांत अत्यंत तप्त झालेल्या मारवाड देशांतील वाळवंटांत ज्याच्या मुळ्या दग्ध होत आहेत त्या चांफ्याचे झाडाचा विकास होण्याचा विचार कोठला? बहुत करून अयोग्य देशांत वास करणाऱ्या मनुष्यांस आपल्या जीविताचें संरक्षण करून राहणेंच मोठ्या पुण्याचें फळ होय. तात्पर्य- विद्यादि गुणानी संपन्न अशा पुरुषांस योग्य देशीं वास घडला नाहीं तर त्याची भरभराटी होण्याचें एक्या बाजूस राहून त्याची उपजीविका चालण्यासही मोठें संकट पडतें. ॥३८२॥

यद्यपि खदिरारण्ये गुप्तो वसतीह चंदनो वृक्षः
तदपि च परिमलमतुलं दिशि दिशि कथयेत् समी-
रणस्तस्य ८३॥

**अर्थ**- जरी या खैराच्या अरण्यांत चंदनाचा वृक्ष गुप्तपणें वास करीत आहे तरी ही वायू हा त्याचा अनुपम सुगंध प्रत्येक दिशेचे ठिकाणीं प्रसिद्ध करील. तात्पर्य- गुणी मनुष्य एकाद्या दुर्देशांत अप्रसिद्धपणानें असला तरी गुणज्ञ लोकांच्या द्वारानें त्याची सर्वत्र प्रसिद्धि होते. ॥३८३॥ श्रीः

भवति हृदयहारी कोपि कस्यापि हेतुर्न खलु गुणविशे-
षः प्रेमबंध-प्रयोगे॥ किसलयितवनांते कोकिलालाप-
रम्ये विकसति न वसंते मालती कोत्र हेतुः॥ ३८४॥

अर्थ- कोणत्याही मनुष्याचें मन हरण करणारा कोणी तरी प्रीतिपात्र असतो. कांहीं एक विशेष गुण प्रेम जडण्यास कारणभूत खरोखर होतनाहीं. पहा ज्यांत सर्व वनप्रांत वृक्षांच्या नवीन कोमल पल्लवानीं शोभायमान दिसतात व कोकिलांच्या मंजुल शब्दानीं जो अत्यंत रमणीय भासतो अशाही वसंत-ऋतूंत मधुमालतीही विकास पावत नाहीं, या विषयीं हेतु कोणता? तात्पर्य स्पष्टच आहे. ३८४.

एतासु केतकि लतासु विकासिनीषु सौभाग्यमद्भुततरं
भवती बिभर्ति॥ यत् कंटके व्यथितमात्मवपुर्न जानं-
स्त्वामेव सेवितुमुपक्रमते द्विरेफः॥ ३८५॥

अर्थ- हे केतकि! त्या विकसित झालेल्या सर्व वल्लींमध्यें एक तूंच आश्चर्यकारक असें सौभाग्य (सौंदर्य) धारण करित्येस. कारण भ्रमर हा आपलें शरीर तुझ्या कांट्यानीं व्यथित झालें हें न जाणून तुझेंच सेवन करण्यास प्रवृत्त होत आहे. तात्पर्य- खऱ्या गुणांचें महत्व जाणणारे मार्मिक पुरुष गुणी मनुष्याच्या इतर दुर्गुणांकडे लक्ष न देतां त्याच्या लोकोत्तर गुणांविषयीं लंपट होतात. ३८५.

न तादृक् कर्पूरे न च मलयजे नो मृगमदे फले वा पुष्पे वा
तव मिलति यादृक् परिमलः॥ परं त्वेको दोषस्त्वयि ख-
लु रसाले यदधिकः पिके वा काके वा लघु गुरु विशेषं न
मनुषे॥ ८६॥

अर्थ- हे आम्रवृक्षा! तुझ्या फलाचे ठिकाणीं अथवा पुष्पाचे ठिकाणीं जसा सुगंध प्राप्त होतो तसा कापुराचे गायीं नाहीं, चंदनाचे ठिकाणीं नाहीं आणि कस्तूरी मध्येंही प्राप्त होत नाहीं. परंतु रसाल नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या तुजमध्यें खरोखर एक मोठा दोष आहे. तो हा कीं, तूं कोकिलाचे ठिकाणीं अथवा कावळ्याचे ठिकाणीं हा लहान व हा मोठा असा भेद कांहींच समज-

न नाहींस. तात्पर्य:- दाता आणि कीर्तिमान् पुरुष प्रशंसनीय खरा; परंतु त्यास गुणवान् मनुष्याच्या योग्यतेचें ज्ञान नसल्यास तो गुणिजनास तादृश प्रिय होत नाहीं. ८६॥

प्रथमवयसि पीतं तोयमल्पं स्मरंतः शिरसि निहित-
भारा नालिकेरा नराणाम् ॥ ददति जलमनल्पं स्वादु
तज्जीवनांतं न हि कृतमुपकारं साधवो विस्मरंति ३८७

अर्थ:- पहिल्या वयांत प्राशन केलेल्या अल्प उदकाची स्मृति ठेवणारे व मस्तकीं त्या उदक देणारांचे उपकारांचा भार वाहणारे नारळाचे वृक्ष जीविताचा अंत होई पर्यंत मनुष्यांस तें अति स्वादिष्ट व पुष्कळ उदक देतात. कारण सज्जन हे दुसऱ्यानें केलेला उपकार कधींही विसरत नाहींत. तात्पर्य स्पष्टच आहे.

अध्वन्यध्वनि भूरुहः फलभृतो नम्रानुपेक्ष्यादराद्
दूरादुन्नतिसंभ्रमव्यसनिनः पांथस्यमुग्धात्मनः॥
यत्-मूलं समुपागतस्य मधुरच्छायाफलैः का क-
था शीर्णेनापि हि नोपयोगमगमत् पर्णेन ताल-
द्रुमः॥३८८॥

अर्थ:- मार्गोमार्गीं फलयुक्त असल्यामुळें वांकलेले अशा वृक्षांची उपेक्षा करून दुरूनच उच्चता पाहून संतोषानें नादीं लागणाऱ्या व ज्याच्या मुळाशीं आलेल्या मूर्ख वाटसरास तालवृक्ष हा गळून पडलेल्याही पानानें उपयोगास आला नाहीं! मग मनोहर अशा छायेनें व फळानीं उपयोगीं पडण्याची गोष्ट तरी कोठली? तात्पर्य:- कोणाच्याही बाह्य डौलावर भुलून नादीं लागणारे मनुष्यास त्यापासून कांहीं इतकाही फायदा न होतां पश्चात्तापांत पडावें लागतें. ३८८

विस्तीर्णो दीर्घशाखाश्रितशकुनिशतः शाखिना
मग्रणीस्त्वं न्यग्रोध क्रोधमंतः प्रकटयसि न चे-
द् वच्मि किंचिन्निदल्पम्॥ जल्पोप्येषे त्रपाकृत प्र
लघुपरिकरा कापि कूष्मांडवल्ली पल्ली एष्ठप्रति-
ष्ठा हसतिहि फलैनें त्वत्फलर्द्धिं किमन्यत्॥३८९॥

अर्थ- हे वटवृक्षा! तूं अतिशय विस्तीर्ण आहेस. तुझ्या लांब लांब फांद्यांवर शें कडों पक्षी आश्रय करून राहिले आहेत. आणि तूं सर्व वृक्षां मध्यें अग्रगण्य आहेस हें खरें, परंतु मनांत जर क्रोध आणणार नाहींस तर कांहीं थोडें मला बोलावयाचें आहे तें बोलतों. आतां हें भाषणही तुला लज्जा उत्पन्न करणारें आहे. तें हेंच कीं, गवळवाड्याच्या पृष्ठभागीं लावलेली अल्प पत्र पुष्पादि परिवारानें युक्त कोणी एक कोहाळ्याची वेलीही फळें प्रसवतानां तुझ्या फलांच्या संपत्तीस खरोखर हसते मग दुसरी गोष्ट काय!

हंसाः पद्मवनाशया मधुलिहः सौरभ्यलाभाशया
पांथाः स्वादुफलाशया बलिभुजो गृध्राश्च मांसाश-
या॥ दूरोदुत्तम पुष्परागनिकरैर्निःसारमिथ्योन्नते रे
शाल्मलिपादप प्रतिदिनं के न त्वया वंचिताः॥ ३९०॥

अर्थ- साररहित उगीच वाढलेल्या अरे शाल्मलि वृक्षा! त्वां हंसपक्षी कमल वनाचे आशेनें फसविले. भ्रमर हे सुगंधाचा लाभ होईल या आशेवर, मार्गस्थ लोक मधुर फलांच्या इच्छेनें, कावळे आणि गृध्र हे मांसाच्या लोभानें फसविले. या प्रमाणें दुरून उत्तम पुष्पांच्या रंगानीं प्रतिदिवशीं तूं कोण कोणांस फसविलें नाहींस! तात्पर्य- बाह्य रंगावर अपरिचित मनुष्य प्रायः फसतो. ९०

यश्च* निंबं परशुना यश्चैनं मधुसर्पिषा॥ यश्चैनं
गंधमाल्याद्यैः सर्वस्य कटुरेव सः॥ ३९१॥ ७ ॥

अर्थ- जो मनुष्य निंबास कुऱ्हाडीनें छेदितो, जो त्याला मध आणि तूप यानीं सिंचन करितो आणि जो त्याला गंधपुष्पें इत्यादिकानीं पूजितो त्या सर्वांना निंब कडू तो कडूच! तात्पर्य- दुर्जनाशीं कोणी कसाही वागला तरी तो आपलें खलत्व सोडावयाचा नाहीं. ३९१

+निष्पेषोस्थिचयस्य दुःसहतरः प्राप्तं तुलारोहणं ग्रा-
म्यस्त्री नखचुंबनव्यतिकरस्तंत्रीप्रहारव्यथा॥ मातं-

---

* येथें मूळ श्लोकांतील तिन्ही वाक्यांत क्रमानें 'छिनत्ति', 'सिंचति', आणि 'अर्चति' या क्रियापदांचा अध्याहार करावा. + या श्लोकांत 'अंगीकृतं' हें क्रियापद लिंगव्यत्यय करून प्रति वाक्यांत लावावें. जसें, निष्पेषः अंगीकृतः व्यथा अंगीकृता इत्यादि.

गोक्षितमंडवारिकणिकापानं च कूर्चाहतिः कार्पासेन
परार्थसाधनविधौ किं किं न चांगीकृतम्॥ ३९२ ॥

अर्थ- कापसानें अस्थिसमूहाचें (सरक्यांचें) दुस्सह पीडन पतकरलें, तुळेवर (धट) चढणें स्वीकारलें. रानटी स्त्रियांचें नखांनीं कुरतुडणें व पिंजाऱ्याच्या तारेच्या प्रहाराचें दुःख सोसलें, अंत्यजांनीं शिंपलेल्या पाजणाच्या पाण्याचे बिंदुप्राशन केले व कुंच्याचें ताडनही करून घेतलें. या वरून या कापसानें परकार्य साधण्या करितां स्वतां कोणकोणते त्रास अंगीकारिले नाहींत! तर सर्व कांहीं क्लेश सोसले. तात्पर्य- सज्जनलोक परोपकाराकरितां स्वतः अनेक संकटें सहनकरि०

किं वीरुधो भुवि न संति सहस्रसंख्या यासां दलानि
न परोपकृतिं भजंति॥ एकैव वल्लिषु विराजति नाग-
गवल्ली या नागरी वदनचंद्रमलं- करोति॥ ३९३ ॥

अर्थ- ज्यांचीं पानें परोपकाराच्या उपयोगीं पडत नाहींत अशा सहस्रावधि वल्ली पृथ्वीवर नाहींत काय? परंतु जी आपल्या पत्रांच्या योगें करून नागरिक सुंदर स्त्रियांच्या मुखचंद्रास सुशोभित करते ती एक नागवल्लीच (नागवेल) सर्व वेलीं मध्यें विराजमान आहे. तात्पर्य- परोपकारी मनुष्य थोडे असतात, व ते सर्वांस मान्य होतात. ३९३.

सर्वास्तुंब्यः समकटुरसास्तुंबिवल्लीप्रसूता स्तासां
बद्धा अपि कतिपया दुस्तरं तारयंति॥ शब्दायंते
सरसमपराः शुष्ककाष्ठे निषण्णा स्तन्मध्येऽन्या ज्व-
लित-हृदयाः शोणितं संपिबंति॥ ३९४॥ छ ॥

अर्थ- भोंपळीच्या वेली पासून उत्पन्न झालेले सर्व भोंपळे रसानें सारखेच कडू असतात; परंतु त्यां पैकीं कित्येक पाठीशीं बांधले असतां दुस्तर अशा पाण्यांतून तारितात. दुसऱ्या वाळलेल्या लांकडांत बसून सुरस असा शब्द करितात आणि त्यांतलेच दुसरे कांहीं भोंपळे (तुंबड्या) हृदयांत प्रज्वलित होऊन रक्त प्राशन करितात. तात्पर्य- एकाच वंशांत जन्मलेले मनुष्यांतून कित्येक आपल्या गुणानें कित्येकांस संकटीं उपयोगीं पडतात. कित्येक दुसऱ्याचें रंजन करितात. आणि कित्येक लोकांस ताप देतात. ३९४

निसर्गादारामे तरुकुलसमारोप-सुकृती कृती मालाकारो

बकुलमपि कुत्रापि निदधे इदं को जानीते यदयमिह
कोणांतरगतो जगज्जालं कर्ता कुसुमभरसौरभ्य भ-
रितम्॥९५॥

अर्थ- वृक्षांची लागवड करून पुण्यसंपादन करणारा कुशल माळी स्वाभाविकपणानें बागेंत कोठें तरी बकुल वृक्षही लाविता झाला. परंतु हें कोणास ठाऊक कीं, येथें कोपऱ्यांत असलेला हा सर्व जगतास आपल्या पुष्पसमूहाच्या सुगंधानें भरून टाकील! तात्पर्य- कीर्तिमान् पुरुष कोठें कुग्रामांत जरी असला तरी तो आपल्या कीर्तीनें सर्व जनांस प्रसिद्ध असतो. ३९५॥

अयि मकरंदस्यंदिनि पद्मिनि मन्ये तवैव सुभगत्वं
पुष्पवतीमपि भवतीं त्यजति न वृद्धः शुचिर्हंसः९६

अर्थ- हे मकरंदस्राव करणारे कमलिनि, सर्व वल्लीं मध्यें तुझेंच विशेष सौंदर्य मी समजतों. कारण वृद्ध (वृद्धिंगत झालेला, पक्षीं म्हातारा.) शुचिर्भूत असा हंस (सूर्य, पक्षीं संन्यासी) तूं पुष्पवती (कमलपुष्पांनीं युक्त, पक्षीं रजस्वला) असतानां देखील तुझा त्याग करीत नाहीं. इतर स्त्रियांस, वृद्ध लंपट व्हावयाचा नाहीं. त्यांतही संन्यासी व तोही सोंवळा असून रजस्वलेचें दर्शनही करावयाचा नाहीं, असें प्रसिद्ध असल्यामुळें कमलिनीचें सौभाग्य कवीनें श्लेषानें वर्णिलें आहे तें योग्य आहे. ९६॥

त्वं चेत् संचरसे वृषेण लघुता का नाम दिग्दंतिना
व्यालैः कांचनकुंडलानि कुरुषे हानिर्न हेम्नः पुनः॥
मूर्ध्ना चेद् वहसे जडांशुमयशः किंनाम लोकत्रयी
दीपस्यांबुजबांधवस्य जगतामीशोसि किं ब्रूमहे ९७

अर्थ- हे महेश्वरा! तूं जर बैलावर बसून संचार करितोस तर त्या योगानें दिग्गजांस लघुत्व तें कोणतें येणार आहे? तसेंच तूं सर्पांच्या योगानें सुवर्ण कुंडलें करितोस या मध्यें सुवर्णाची हानि ती कोणती होणार आहे? मस्तकें करून जलमय किरणांचा चंद्र जर तूं धारण करीत आहेस तर त्या योगानें त्रिभुवनाचा केवळ दीपच अशा कमलबांधव सूर्याची काय अपकीर्त्ति होणार आहे? असो. आपण जगाचे ईश्वर आहां. आपणांस आम्हीं काय बोलावें? ३९७॥ ७॥

युक्तोऽसि भुवनभारे मा वक्रां वितनु कंधरां शेष॥ त्वय्ये-
कस्मिन् दुःखिनि सुखितानि भवंति भुवनानि॥३९८

अर्थ:- हे शेषा! तुला सर्व भुवनांचा भार धारण करण्या करितां योजिलें आहे. या मुळें तूं आपली मान वक्र करूं नकोस. कारण तूं एकटा दुःखित असतानां सर्व भुवनें सुखी होतात. तात्पर्य- सत्पुरुष आपण दुःख सहन करून जगतास सुख देतात. ३९८.

यत्पादाः शिरसा न केन विधृताः पृथ्वीभृतां मध्यतः
तस्मिन् भास्वति राहुणा कवलिते लोकत्रयीचक्षुषि॥
खद्योतैः स्फुरितं तमोभिरुदितं ताराभिरुज्जृंभितं
घूकैरुत्थितमाः किमत्र करवै किं किं न कैश्चेष्टितम् ३९९

अर्थ:- कोणी एक पुरुष अन्योक्तीनें ह्मणतो कीं, ज्याचे पाद (पाय- किरण) सर्व मोठमोठ्या पर्वतानींहीं शिरसा वंदित केले. असा जगत्त्रयाचा चक्षुरूपी सूर्य राहूनें क्षणभर ग्रासिला असतां पहा काय काय चमत्कार झाले ते!! काजवे चमकूं लागले, अंधकारानेंही आपला अमल बसविला, तारे उदयास आले, घुबडें उडूं लागलीं, काय सांगावें! सर्वांनीं वाटेल तें केलें, यांत तात्पर्य असें कीं, तेजस्वी पुरुषास संकटसमय आला असतां क्षुद्रांचें वर्चस्व होतें.॥ ३९९॥ छ॥

अहो नक्षत्रराजस्य साभिमानं विचेष्टितम्॥ परिक्षी-
णस्य वक्रत्वं संपूर्णस्य सुवृत्तता॥ ४००॥

अर्थ:- अहो! या चंद्राचें आचरण पहा, कसें अभिमानपूर्वक असतें तें. कारण तो क्षयतिथीस आला असतां वक्र आणि पौर्णिमेस सुवृत्त (वर्तुळाकार) असा असतो. तात्पर्य- धीर लोक आपत्कालींही आपला बाणा सोडीत नाहींत. ॥४००॥

वरमेका कला रम्या ययाऽधः क्रियते भवः॥
बह्वीभिरपि किंताभिः कलंको यासु दृश्यते ॥१॥

अर्थ.- " (चंद्रास- आणि पुरुषास) एकच पण रम्य अशी कला (पक्षीं- विद्या) असणें बरें. कारण जी शंकरास (पक्षीं संसारास) ही खालीं करते ह्मणजे पहिल्या अर्थी त्यांचे मस्तकावर आरूढ झाली आहे. आणि दुसऱ्या- अर्थी तिच्या योगानें संसारनाश होतो, परंतु ज्यांत कलंक (पक्षीं पातक) आहे अशा त्याच पुष्कळ असून काय करावयाच्या आहे!!" ४०१॥ श्रीशोजयति.

तृणं चाऽहं वरं मन्ये नरादनुपकारिणः॥
घासो भूत्वा पशून् पाति भीरून्पाति रणांगणे॥४०२॥

अर्थ- उपकार न करणाऱ्या नरापेक्षां गवत श्रेष्ठ आहे असें मला वाटतें. कारण तें घांसरूपानें पशूंचें रक्षण करतें. आणि रणांत भित्रे लोकांस रक्षण करतें, म्हणजे त्यांनीं दांतीं तृण धरलें असतां त्यांवर शत्रु शस्त्र धरीत नाहींत. तात्पर्य परोपकारा सारखा दुसरा कोणताही मोठेपणा नाहीं. ४०२॥

चिरं ध्याता रामा क्षणमपि न रामप्रतिकृतिः परं
पीतो रामाऽधर इह न रामांघ्रिसलिलम्॥ नता
रुष्टा रामा यदरचि न रामाय विनतिः गतं मे सा-
म्राज्यं न दशरथजन्मा परिगतः॥४०३॥

अर्थ- कोणे एका राजास पश्चात्ताप झाला असतां तो म्हणतो, अरेरे मीं फार दिवस स्त्रीचेंच ध्यान केलें. परंतु राममूर्ति क्षणभरही ध्यानांत आणिली नाहीं. त्याच प्रमाणें मीं स्त्रीचें अधरामृतपान केलें परंतु रामपदाचें तीर्थ कधींच सेविलें नाहीं. त्याच प्रमाणें स्त्री रुष्ट झाली असतां मी तिच्या पायांहि पडलों. पण रामचंद्रास कधींही एक नमस्कार केला नाहीं. तसें सार्वभौम पद देखील मी मिळविलें परंतु दशरथापासून जन्म ज्याचें त्या रामचंद्राची प्राप्ति मीं करून घेतली नाहीं! तात्पर्य- ऐहिक सुख किती जरी मिळालें तरी तें पारमार्थिक सुखापुढें अगदीं तुच्छ आहे. अर्थात्- पश्चात्ताप होई पर्यंत पहिलें सुख मिळविण्या विषयीं उद्योग न करितां पारमार्थिक सुखा विषयीं उद्योग करावा.॥४०३॥

या स्वसद्मनि पद्मेऽपि संध्यावधि विजृंभते॥
इंदिरा मंदिरेऽन्येषां कथं स्थास्यति निश्चला॥४०४

अर्थ- कमल हें स्वकीय गृह असून त्यांतही जी केवळ संध्याकालपर्यंतच नांदते, ती लक्ष्मी अन्यांचे घरीं निश्चलपणें कशी राहील? तात्पर्य- असा कोणीही भरवसा धरूं नये कीं, मला प्राप्त झालेली संपत्ति अखंडपणें माझ्याजवळ राहील. ४०४.

यस्मिन् रुष्टे भयं नाऽस्ति तुष्टे नैव धनागमः॥
निग्रहानुग्रहौ नस्तः स रुष्टः किं करिष्यति॥४०५॥

अर्थ:- जो राजा बला असतां मुळींच ज्या पासून प्रीति उत्पन्न होत नाहीं, किंवा जो प्रसन्न झाला असतां ज्या पासून कांहीं धनप्राप्तीही नाहीं ह्मणजे ज्याच्या हातांत कांहीं शासन करण्याचा अधिकार नाहीं किंवा कृपाही करण्याचें सामर्थ्य नाहीं, तो रागावला तरी काय करणार आहे? ४०५

धनं यदि गतं गतं चरणयुग्मरेणूपमं धरा यदि गता गता कथय मे किमेतावता॥ इदं पुनररुंतुदं धनिगणैरिदानींतनैः दरिद्रगणनाविधौ यदहमंकपाते धृतः ४०६॥

अर्थ:- कोणी एक पुरुष आपल्याशीं ह्मणतो कीं, माझें धन जरी गेलें आहे तरी जाईना. धन ह्मणजे माझ्या पायांची धूळ आहे तशीच माझी जमीन गेली तर गेली तेवढ्यानें माझें काय होणार सांगबरें? परंतु सांप्रतचे श्रीमंत लोक दरिद्रलोकांची संख्या करते वेळीं मला त्यांत धरतात. एवढें मात्र माझ्या मर्मास अति दुःख देतें. तात्पर्य- अगोदर श्रीमंत असून पुढें त्यास दारिद्र्य आलें असतां त्यास त्या विषयीचें फारसें दुःख नसतें. परंतु तूं दरिद्री आहेस असें त्यास कोणी ह्मटलें तर अतिशयच दुःख होतें. ४०६.

दारिद्र्याद्ध्रियमेति ह्रीपरिगतः प्रभ्रश्यते तेजसो॥
निस्तेजाः परिभूयते परिभवान्निर्वेदमापद्यते ॥
निर्विण्णः शुचमेति शोकपिहितो बुद्ध्या परित्यज्यते॥
निर्बुद्धिः क्षयमेत्यहो निधनता सर्वापदामास्पदं ४०७

अर्थ:- पुरुषास दारिद्र्यामुळें लज्जा उत्पन्न होते. तो लज्जाविष्ट झाला असतां तेजोभ्रष्ट होतो. निस्तेज झाला असतां सर्व लोक निर्भयपणें त्याचा तिरस्कार करितात. तिरस्कार होऊं लागला असतां त्यास खेद उत्पन्न होतो. खिन्न होऊन शोक करूं लागतो. असा शोकग्रस्त झाला असतां त्याची बुद्धी नाहींशी होते. आणि असा बुद्धिहीन झाला असतां क्षयाप्रत पावतो. अहो, हर हर! हें दारिद्र्य सर्व आपदांचें स्थानच आहे. ॥४०७॥

मेघा वर्षंतु गर्जंतु मुञ्चन्त्वशनिमेव वा॥
गणयंति न शीतोष्णं रमणाभिमुखाः स्त्रियः॥४०८॥

अर्थ- पावसाची झड लागली असो, मेघांचा गडगडाट कां होईना, आणि वज्रपातही होवो, थंडी असो उन्हाळा असो, कांहीं कां होईना, आपल्या प्रियकराकडे जाण्यास निघालेल्या स्त्रिया कोणास देखील जुमानीत नाहींत. तात्पर्य स्त्रियांस साहसी असें जें कोठें म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. ४०८॥

चीयंते बालिशस्यापि सत्क्षेत्रपतिता कृषिः
न शालेः स्तंबकरिता वप्तुर्गुणमपेक्षते॥४०९

अर्थ- सत्क्षेत्र म्हणजे ज्याच्यामध्यें सर्व प्रकारचें धान्य होण्याची योग्यता आहे अशा शेतांत एकाद्या अडाणी मनुष्यानें जरी नांगरणी केली तथापि तीच अधिक फलरूपानें वृद्धिंगत होते. म्हणजे विपुल धान्य उत्पन्न होण्याला पेरणी करणारा माणूस मोठा गुणी हवा असें नाहीं. ती भूमि उत्तम असली म्हणजे झालें.

अप्राज्ञेन च कातरेण च गुणः स्यात् सानुरागेण कः प्रज्ञाविक्रम शालिनोऽपिहि भवेत् किं भक्तिहीनात्फलम् ॥ प्रज्ञाविक्रमभक्तयः समुदिता येषां गुणा भूतये ते भृत्या नृपतेः कलत्रमितरे सम्पत्सु चापत्सु च ॥ ४१०॥

अर्थ- बुद्धिहीन व पराक्रमशून्य असा एकादा सेवक आपल्या स्वामीवर मोठी भक्ति करणारा आहे, तरी त्या पासून त्या स्वामीस काय उपयोग होणार आहे! त्याच प्रमाणें एकादा सेवक बुद्धिसंपन्न व पराक्रमशाली असाही आहे, पण भक्तिहीन आहे तर मग त्या पासून तरी राजास काय उपयोग होणार? आतां बुद्धि पराक्रम आणि भक्ति हे तिन्ही गुण ज्यांच्या जवळ समस्त आहेत ते सेवक आपल्या राजास संपत्कालीं उत्तरोत्तर अधिक ऐश्वर्य प्राप्त करून देण्यास व आपत्कालीं विपत्तींतून पार पाडण्यास समर्थ होतात. व यासच सेवक असें म्हणावें; परंतु असे जे नसतील ते ऐश्वर्यादि लाभाच्या इच्छेनें सेवा करणाऱ्या स्त्री प्रमाणें समजावे. ४१०॥

कमलानां मनोहराणामपि रूपाद्विसंवदति शीलं
संपूर्ण मंडलेऽपि यानि चंद्रे विरुद्धानि ॥ ४११॥

अर्थ— ज्याचें जसें रूप दिसतें तसेंच त्याचें शीलही असतें असें म्हणतां येत नाहीं. हीं सूर्यविकासी कमलेंच पहा. खरोखर हीं सूर्योदयीं विकसित

झाली असतां कशी मनोहर दिसतात; परंतु तींच पूर्णचंद्रोदयीं विरुद्ध गुणांचीं ह्मणजे मुकुलित होतात. तात्पर्य एकादा पुरुष अतिसुंदर जरी आहे तथापि त्याच्या प्रतिपक्ष्याचा उत्कर्ष झाला असतां त्यास तो सहन न झाल्यामुळें तो सुंदर पुरुष दुर्मुखलेला होतो. ॥४११॥

किं शेषस्य भरव्यथा न वपुषि क्ष्मां न क्षिपत्येष यत् ॥
किंवा नास्ति परिश्रमो दिनपते रास्ते न यन्निश्चलः ॥
किं त्वंगीकृत मुत्सृजन् कृपणवत् श्लाघ्यो जनो लज्जते ॥
निर्वाहः प्रतिपन्नवस्तुषु सतामेतद्धि गोत्रव्रतम् ॥४१२॥

**अर्थ:-** या शेषानें एकदा जी पृथ्वी आपल्या मस्तकावर धारण केली आहे ती तो मुळींच खालीं उतरीत नाहीं, ह्मणून त्यास तिचा भार होत नाहीं काय? तसाच हा सूर्य क्षणभरही निश्चल होत नाहीं, ह्मणून त्यास परिश्रम होत नाहीं काय? अहो शेषास पृथ्वीच्या भारामुळें व्यथा होते; सूर्यही भ्रमण करितां करितां थकून जातो; परंतु एकदा ज्याचा अंगीकार केला त्याचा कृपण पुरुष जरी त्याग करतो तरी तसें करण्या विषयीं श्लाघ्यजनांस लज्जाच वाटते. सारांश, एकदा जी गोष्ट पतकरली तिचा शेवटपर्यंत प्रतिपाल करणें हें सत्पुरुषाचें कुलोचित व्रतच आहे. ४१२.

रूपादीन्विषयान्निरूप्य करणैर्यैरात्मलाभस्त्वया ॥
लब्धस्तेष्वपि चक्षुरादिषु हताः स्वार्थावबोधक्रियाः ॥
अङ्गानि प्रसभं त्यजंति पटुता माज्ञाविधेयानि मे ॥
न्यस्तं मूर्ध्नि पदं तवैव जरया तृष्णो मुधा माद्यसि ४१३

**अर्थ:-** कोणी एक जरा आलेला पुरुष ह्मणतो. हे तृष्णे! ज्या इंद्रियांचे साधनांनीं तूं आत्मलाभ करून घेतलास तीं नेत्रादिक इंद्रियें तर आपापल्या विषयाचें ग्रहण करण्या विषयीं अगदीं असमर्थ झालीं आहेत. तसेंच मी म्हणेन तें करण्यास केवल सेवकाप्रमाणें तत्पर असे माझे हस्तादिक अवयव देखील दानादिक स्वस्व कर्मा विषयीं सामर्थ्यहीन झाले आहेत. काय सांगावें! तुझ्याच मस्तकावर या जरेनें पाय दिलासें वाटतें. परंतु खरोखर आतां तूं उगीच अधिकाधिक वाढत चालली आहेस!!! सारांश विषयभोगार्थच तृष्णा उत्पन्न होते. व विष-

---

† [illegible] झालास. ‡ वार्धक्यानें- म्हणजे [illegible] ठिकाणीं वृद्धिंगतपणा आला आहे.

य भोग तर इंद्रियें पटु असल्या शिवाय घडत नाहीं. व तेंही इंद्रियपाटव तारुण्यांतच असतें. तर मग जरावस्थेंत तृष्णा उत्पन्न झाली असतां ती व्यर्थच होय.

छन्नं कार्यमुपक्षिपंति पुरुषा न्यायेन दूरीकृतम्॥
स्वान् दोषान् कथयंति नाधिकरणे रागाभिभूताः स्वयम्॥ तैः पक्षापरवक्षवर्द्धितबलैर्दोषैर्नृपः
स्पृश्यते संक्षेपादपवाद एव सुलभो द्रष्टुर्गुणो दूरतः॥ ४१४॥

अर्थ- न्यायाधीशास दुसऱ्याच्या चित्ताचा संतोष राखणें फार कठीण असल्यामुळें त्याची स्तुति तर नाहींच, पण निंदा मात्र होते, कारण न्यायसभेंत वादी प्रतिवादी लोक आपापला स्वार्थ साधण्या विषयीं परस्पर रागद्वेषादियुक्त असल्यामुळें अन्यायानें खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे असे आपले पक्ष सिद्ध करून दाखवितात, परंतु आपले दोष सांगत नाहींत. त्या दोषांतही स्वपक्षाच्या सत्यतेच्या पुष्ट्यर्थ त्यानीं दिलेले कपटाचे पुरावे वगैरे दोषांची भर पडते, परंतु खटल्याचे स्वरूपानुसार व कायद्यास अनुकूल असें मत देणें अवश्य असल्यामुळें ते सर्व दोष न्याय देणाऱ्या राजाच्या माथीं येतात. सारांश न्याय करणारा सर्वप्रकारें योग्य असून त्यानें खटल्याच्या खऱ्या स्वरूपा विषयीं बारकाईनें विचार करून मग न्याय द्यावा. ॥१४॥

भवति पुरुषस्य व्याधिर्मरणं सेविते अपथ्ये
राजापथ्ये पुनः सेविते सकलं कुलं म्रियते॥४१५.

अर्थ- एकाद्या रोगास जें पथ्य केलं पाहिजे तें जर न केलें तर तो रोग मरणाव ह जरी होतो तथापि ज्यास तो रोग जडला असेल तो एकटाच मरण पावेल परंतु राजास जी गोष्ट न मानवेल ती करणारा पुरुष आपल्या सर्व कुळासह नाश पावतो. ४१५.

भीताभयप्रदानं ददतः परोपकाररसिकस्य॥
यदि भवति भवतु नाशस्तथापि लोके गुण एव ४१६

अर्थ- भयभीत झालेल्यांस अभयदान देणारा आणि दुसऱ्यांवर उपकार करण्याची हौस ज्याला अशा पुरुषाचा नाश जरी होत आहे तथापि होईना; परंतु जगतांत तेणें करून त्याची सत्कीर्तिच होते. ४१६.

## वैतालीय.

पंचजना येन मारिताः स्त्रियं मारयित्वा यामो रक्षितः
अबलश्च चांडालो मारितोऽवश्यं स नरः स्वर्गं गाहते ४१७

अर्थ- शरीर रक्षण करून व नेत्रादिक पांच ज्ञानेंद्रियें माया आणि निर्बल झालेला अहंकार इतक्यांस जिंकून ज्या पुरुषानें आपलें सर्व आयुष्य ईश्वरचिंतनांत घालविलें तोच पुरुष स्वर्गारोहण करण्यास योग्य होतो.

खल चरितनिकृष्ट जातदोषः कथमिह मां परिलोभसे
धनेन ॥ सुचरितचरितं विशुद्धदेहं न हि कमलं मधुपाः
परित्यजंति ४१८

अर्थ- मृच्छकटिक नाटकांत वसंतसेना शंकरास बोलते. अरे दुर्जना, हे दुराचारलंपटा, तूं एकदा माझा अपराध केला असून आतां मला धन देऊन वश करूं पाहतोस काय? अरे, मला धनाची होस मुळींच नाहीं. व मला तूं आवडतही नाहींस. तेव्हां तुझा हा सर्व प्रयत्न व्यर्थ आहे. आणि तुला आतां मी एकच सांगतें कीं, सर्व जनांच्या चित्तास आनंददायक आणि सर्वांगसुंदर अशा कमलास सोडून अन्यपुष्पाकडे भ्रमरी कधीं जात नाहींत. ४१८.

कांश्चित्तुच्छयति प्रपूरयति वा कांश्चिन्नयत्युन्नतिं
कांश्चित्पातविधौ करोति च पुनः कांश्चिन्नयत्याकुलान् ॥
अन्योन्यं प्रतिपक्षसंहतिमिमां लोकस्थितिं बोधयन्
एष क्रीडति कूपयंत्रघटिकान्यायप्रसक्तो विधिः ४१९

अर्थ- दैव हें कूपयंत्रघटिकान्यायाप्रमाणें जीवांस वागवितें. विहिरींतून पाणी काढण्यास केलेला जो रहाट त्यास बांधलेलीं गाडगीं (पोहरे इ०) हीं जशीं फेऱ्याच्या क्रमानें कांहीं भरून वर आलेलीं रिकामीं होतात. कांहीं खालून पाण्यानें भरलेलीं अशीं वरती येत असतात. आणि कांहीं तर सैल होऊन एकाएकीं पडून तळास जातात त्याच प्रमाणें लोकस्थिति देखील अशीच एकमेकांशीं विरुद्ध धर्माची आहे असें सत्वविचारें हें दैव पहा कसें क्रीडा करीत आहे! तें कित्येक लोकांस तुच्छ ह्मणजे निर्धन व मानरहित असें करून सोडतें. कित्येकांस धनमानादिकांनीं पूर्ण मनोरथ असें करतें आणि कित्येकांस तर अगदीं अ-

---

१ येथें कमल हा शब्द चारुदत्ताला उद्देशून आहे. २ भ्रमरी हा श० तिनें स्वतःस उद्देशून उच्चारला आ॰

धःपातास नेतें. ।। ४१९

गुणेषु यत्नः पुरुषेण कार्यः न किंचिदप्राप्यतमं गुणानां
गुणप्रकर्षादुडुपेन शंभो रलंघ्यमुल्लंघितमुत्तमांगं ४२०

**अर्थ-** पुरुषानें गुणसंपन्न होण्याविषयीं प्रयत्न करावा. कारण ज्या जवळ गुण आहेत त्यास कोणतीही गोष्ट प्राप्त करून घेणें कठीण आहे असें नाहीं. पहा. हा चंद्रच गुण (कला) संपन्न असल्यामुळें शिवाच्या अलंघ्य अशा मस्तकावर जाऊन बसला आहे.

सुखं हि दुःखान्यनुभूय शोभते घनांधकारेष्विव दीपदर्शनम् ॥ सुखात्तु यो याति नरो दरिद्रतां धृतःशरीरेण मृतः स जीवति ॥ ४२१ ॥

**अर्थ-** जेथें निबिड अंधकार आहे तेथें दीपदर्शन झालेलें जसें चांगलें त्या प्रमाणें दुःखें भोगून भोगून एकाद्यास प्राप्त झालेलें सुख फार चांगलें दिसतें. परंतु सुखें उपभोगून जो पुरुष दरिद्री होतो तो पुरुष सशरीर असून मेल्याप्रमाणेंच जगांत असतो. ४२१.

ऐश्वर्यादनपेतमीश्वरमयं लोकोऽर्थतः सेवते तं गच्छत्यनु ये विपत्तिषु पुनस्ते तत्प्रतिष्ठाशया ॥ भर्तुर्ये प्रलयेऽपि पूर्वसुकृतासंगेन निःसंगया भक्त्या कार्यधुरां वहंति कृतिनस्ते दुर्लभास्त्वादृशाः ॥ ४२२ ॥ ६ ॥

**अर्थ-** ज्याच्या जवळ ऐश्वर्य आहे अशा स्वामीची हे लोक जी सेवा करतात ती ते केवळ आपल्या कल्याणाच्या इच्छेनें करितात, यांत कांहीं मोठेपणा नाहीं, तसेंच स्वामी ऐश्वर्यहीन होऊन विपत्तिग्रस्त झाला असतां स्वामीस जें दुःख तेंच आपलें दुःख असें मानून जे कोणी त्याची सेवा करितात त्या सेवा करण्यांतत्याचा इतकाच हेतु असतो कीं, आपण स्वामीचे मोठे इमानी सेवक आहों अशी जगांत आपली कीर्ति व्हावी किंवा आपला स्वामी पुनः ऐश्वर्यारूढ झाला तर आपलें कल्याणच होईल, अशा कोणत्या तरी हेतूनें ते लोक सेवा करितात. तेव्हां यांतही कांहीं फारसा मोठेपणा नाहीं; परंतु स्वामीवर मरणाचें संकट ओढवलें आहे, अशा अणिबाणीच्या वेळीं त्यानें पूर्वी केलेले उपकार स्मरून निर्लोभ अशा स्वामिभक्तीनें युक्त जे कोणी त्यानें सांगितलेल्या महत्कृत्याविषयीं सतत चिंता वाहतात. असले धन्य सेवक हे राक्षसा तुझ्या सारखे फारच दुर्लभ

आहेत.

ये वदंति चपलेत्यपवादं नैव दूषणमिदं कमलायाः
दूषणं जलनिधेर्हि भवेत्तद्यत्पुराण पुरुषाय ददौ ताम् ४२३

अर्थ- ही लक्ष्मी आज येथें, उद्यां तेथें, परवां तिसरेच ठिकाणीं अशी राहते. स्थिरपणें कोठेंही एक ठिकाणीं रहात नाहीं. या मुळें तिला लोक चपला असा अपवाद देतात. परंतु हा तिचा दोष नाहीं. हा दोष तिचा पिता जो समुद्र त्यास द्यावा. कारण त्यानें तिचें लग्न पुराणपुरुषाशीं कां बरें करावें? ॥ ४२३॥

मन्निंदया यदि जनः परितोषमेति नन्वप्रयत्नसुलभो
ऽयमनुग्रहो मे ॥ श्रेयोर्थिनोऽपि पुरुषाः परितुष्टिहेतो
र्दुःखार्जितान्यपि धनानि परित्यजंति ॥ ४२४॥

अर्थ- माझी निंदा केल्यानें जर लोकांस संतोष होतो, तर मग उद्योग किंवा प्रयत्न न करतां सहजच मजवर ईश्वराचा हा मोठा प्रसादच झाला असें मी समजतों. कारण आपलें कल्याण व्हावें असें इच्छिणारे पुरुष दुसऱ्याचा संतोष राखण्या करितां काय काय उद्योग करितात. अहो जातीनें आपण दुःखें भोगून संपादन केलेल्या धनाचा देखील ते त्याग करितात. आणि मी तर एक छदामही पदरचा खर्च केल्या शिवाय दुसऱ्यास संतुष्ट करतों. तात्पर्य, मोठ्या मनाचे पुरुषांची लोकांनीं निंदा केली असतां त्यास आनंदच होतो. कारण निंदा झाल्यानें आपले दोष आपणांस कळून आपण अधिकाधिक चांगले होऊं!! असें त्यास वाटतें. ४२४॥

क्लेशत्यागकृतेऽर्पितेन करणव्यूहेन देहेन च स्वानर्थं
बत जंतुरार्जयति चेन्मंतुर्नियंतुः कुतः ॥ शस्त्रं शत्रु-
जयाय नैजगुरुणा दत्तोऽथ तेनैव चेत् पुत्रो हंति
निजं वपुः कथय रे तत्रापराधी तु कः ॥ ॥ ४२५॥

अर्थ- जन्ममरणरूप संसार दुःखापासून सुटका व्हावी या साठीं जगन्नियंत्या परमेश्वरानें हा नृदेह देऊन बुद्धि मन इत्यादि इंद्रियें देखील दिलीं आहेत असें असून त्यांचे साधनानीं आत्मलाभ करून न घेतां अरेरे! जर हा प्राणि पुनः आपल्यावर अनिष्टच आणील तर हा अपराध त्या परमेश्वराचा कसा होईल!

१ पुराण म्हणजे फार वृद्ध - पक्षीं पुराण म्हणजे विष्णु.

खरेंच आहे. एकाद्या पुत्रास त्याच्या पित्यानें शत्रूस जिंकण्या करितां शस्त्र दिलें आहे, परंतु तो पुत्र त्या शस्त्रानें आपलेंच डोकें जर कापून घेईल तर त्यांत अपराधी कोण हें सांग? ४२५

उपदेशो हि मूर्खाणां प्रकोपाय न शांतये॥
पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनं॥४२६

अर्थ:- मूर्खास त्याच्या बऱ्यार्ची गोष्ट सांगितली असतां त्याचें चित्त शांत न होतां उलट त्यास अधिक क्रोध मात्र येतो. खरेंच आहे. सर्पास दूध पाजलें तर विषाचीच वृद्धि होणार! ४२६.

अरण्यरुदितं कृतं शवशरीर मुद्वर्तितम्
स्थलेब्जमवरोपितं सुचिरमूषरे वर्षितम्
श्वपुच्छमवनामितं बधिरकर्णजापःकृतः
धृतोंऽधमुखदर्पणो यदबुधोजनःसेवितः ४२७॥

अर्थ:- कोणी एक विद्वान पुरुष खिन्न होऊन ह्मणतो- मी आजपर्यंत मूर्खमनुष्याची सेवा केली हें जें कांहीं केलें तें मीं अरण्यांत रुदन केलें, प्रेताच्या शरीरास सुगंधी पदार्थांनीं सुवासित केलें, निर्जल अशा भूमीवर कमलाचे तारवे लावले, पाषाणमय प्रदेशावर जलाचा वर्षाव केला, कुत्र्याचें शेंपूट सरळ करण्या करितां तें बांकवीत बसलों, बहिऱ्यास हलकेंच कानांत मसलती विचारिल्या, आंधळ्यास मुखापुढें आरसा दाखविला, सारांश हीं कृत्यें जशी व्यर्थ आणि वेडगळपणाचीं आहेत तद्वत् मूर्खाची सेवा करणें अगदीं व्यर्थ आहे.॥४२७॥

गात्रं कंटकसंकटं प्रविरलच्छाया न चायासहृत्
निर्गंधः कुसुमोत्करस्तव फलं न क्षुद्विनाशक्षमम्
बब्बूलद्रुम मूलमेति न जनस्तत्तावदास्तामहो
अन्येषामपि शाखिनां फलवतां गुप्त्यै वृतिर्जायसे॥४२८॥

अर्थ:- कोणी एक पुरुष मोठ्यानें एका बब्बुल (बाभूळ) वृक्षास अन्योक्तीनें ह्मणतो. अरे तुझें अंग पहावें तर तें सर्व कांट्यांनीं व्याप्त आहे. श्रम परिहार करणारी छाया तुजजवळ आहे ह्मणावी तर तीही विरळच. बरें तुझीं फळें पाहिलीं तीं खाल्लीं तर क्षुधा देखील शांत होणार नाहीं. तुझीं पुष्पें हुंगलें त्यातीं

पण त्यांस सुवास नाहीं. तेव्हां यामुळें तुझ्यापाशीं कोणीही माणूस येत नाहीं. हें तर राहूं द्या. परंतु आश्चर्य हेंच कीं, दुसऱ्या वृक्षांस असलेलीं फळें कोणास घेतां येऊं नये म्हणून त्यांचे रक्षणार्थ तूं कृपण होऊन राहातोस. तात्पर्य-कितीएक दुष्ट लोक स्वतः दुसऱ्यास उपयोगीं पडत नाहींत तर नाहींत, परंतु एकाद्याचें दुसऱ्या पासून कांहीं हित होत असल्यास तेथेंही विघ्न करायास हे आहेत. ४२८.

संवर्धितोऽपि भुजंगः पयसा न वश्यः तत्पालकानपि निहंति बलेन सिंहः॥ दुष्टः परैरुपकृतस्तदनिष्टकारी विश्वास लेश इह नैव बुधैर्विधेयः॥ ४२९॥

अर्थ- सर्पास दूध पाजून जरी वाढविलें तथापि तो कांहीं माणसाळत नाहीं. तसेंच सिंह तर दांडगाई करून आपल्या पालकालाही ठार करतो. आणि दुष्टावर दुसऱ्यानीं किती जरी उपकार केले तरी तो त्याचेंच अनिष्ट करूं पाहतो. तेव्हां शहाणे लोकांनीं असल्या ठिकाणीं विश्वास ठेवूं नये. ४२९॥

संत्यज्य शूर्पवद्दोषान् गुणान् गृह्णाति पंडितः
दोषग्राही गुणत्यागी पल्लोलीव हि दुर्जनः ४३०

अर्थ- सूपा प्रमाणें पंडित हा दोष टाकून गुणांचें मात्र ग्रहण करतो, परंतु दोषसंग्रह करून गुणांचा त्याग करणारा चाळणी प्रमाणें एक दुर्जन मात्र होय.॥ ४३०॥

अशक्ताः शक्तिमात्मीयां श्लाघयंते च दुर्जनाः
ते भवंत्युपहासाय महतामेव सन्निधौ ४३१॥

अर्थ- दुर्जन लोक अशक्त असले तरी आपल्या शक्तीची व्यर्थ स्तुति करीत असतात; परंतु जर का एकाद्या महान् पुरुषाशीं गांठ पडली तर ते उपहासास पावतात. ४३१.

पान्थान्दीनानहह वसुमानातपाधान् विधत्ते
शुष्कां पृथ्वीं रचयतितरां शोषयत्योषधीश्च
कासाराणां हरति विभवं क्लांतशांतिप्रदानां
क्रूरस्यैवं गुणलवकथा कास्वतो भास्वतोऽस्य ४३२

अर्थ- विश्वगुणादर्शनामें काव्यांत गुणग्राही अशा विश्वावसु गंधर्वानें सूर्यास नमस्कार केला असतां केवल दोषच पाहणारा असा कृशानुनामें गंधर्व

त्यास ह्मणतो मित्रा, तूं या सूर्यास नमस्कार कशासाठीं करतोस? कारण हा स्वतः वसुमान (द्रव्यवान् व तेजस्वी) असून बिचाऱ्या दीन अशा वाटसरूलोकांस आपल्या उन्हाच्या कडाक्यानें त्यांच्या डोळ्यांस अंधारी आणून दिसेनासें करून सोडतो. तसेंच या पृथ्वीला अगदीं शुष्क (रखरखीत) करतो. ओषधींतला रस शोषून घेतो आणि चालून चालून थकवा आलेल्या प्राण्यांस शांतिप्रद अशा तळ्यांचें केवल ऐश्वर्यच असें जें उदक त्यासही हरण करितो. (सर्व तळीं इ० कोरडीं ठणठणींत करून टाकतो.) तर असा हा क्रूर असून याजपाशीं एक गुणलेशही नाहीं वास्तव हा सूर्य नमस्कारास मुळींच पात्र नाहीं. ४३२॥

दृष्टिं घृष्टिभिरारचय्य जगतस्तुष्टिं ससर्ज यः पुष्टिं द्राग्विशिनष्टि दृष्टिषु नृणां ध्वांतं पिनष्टि स्थिरम्॥ प्रज्ञानामपवर्गमार्गदममुं पद्मागृहोल्लासिनं को न स्तौति समस्तलोकसुहृदं द्योभूषणं पूषणम्॥ ४३३॥

अर्थः- या वरील श्लोकाच्या संबंधानेंच हें विश्वावसूचें कृशानूस उत्तर आहे. तो ह्मणतो अरे सर्व जगताचें हित करणाऱ्या सूर्याची देखील तूं निंदा करतोस! हे दोषैक दृक्! हा सूर्य किती गुणसंपन्न आहे तें ऐक. पहा हा सर्व जगतावर आपल्या किरणांनीं पर्जन्यवृष्टि करून सर्वांस वारंवार संतोष देऊन सर्व प्राण्यांच्या दृष्टीचें पोषण करतो. तसेंच सर्व रात्रभर असलेल्या अंधकाराचा नाश करून ज्ञानसंपन्न झालेल्या मुमुक्षूस मोक्षमार्ग देतो. कमलसमुदायास प्रफुल्लित करणारा आणि सर्वांचा केवल प्रियसखाच अशा या आकाशांतील भूषणभूत सूर्यास कोण नमस्कार आणि स्तुति करणार नाहीं!! ४३३

वेदव्यासः स नव दश यो वेदवेदाक्षराणि
श्लोकं त्वेकं परिपठति यः स स्वयं जीव एव
आपस्तंबः स इह कलयेत् सम्यगोपासनं यः
कष्टं शिष्टक्षतिकृति कलौ कोऽर्थ्यमृच्छति विद्याः ४३४

अर्थः- या कलिकालाचा महिमा काय वर्णन करावा! ज्या कोणास वेदांतील नउ किंवा दहाच अक्षरें येत असतील तो साक्षाद्वेदव्यासच बनतो. कोणास नुसता एक श्लोक अर्थतः येऊं लागला कीं तो बृहस्पति झालाच! एकाद्यास

केवल स्मार्ताग्नीची उपासना असली कीं, त्यास आपस्तंब ऋषीचीच योग्य ता येते. अरे अरे! शिष्टांचा ऱ्हास करणाऱ्या या कलिकालांत सर्व विद्या क्षीण होत आहेत! ४३४॥

अयश्चणकचर्वणं फणिफणामणेः कर्षणम्
करेण गिरितोलनं जलनिधेः पदालंघनम्॥
प्रसुप्तहरिबोधनं निशितखड्ग संस्पर्शनम्
कदाचिदखिलं भवेन्न च शठाद्धनस्यार्जनम् ४३५

अर्थ- लोखंडाचेही चणे चावून खातां येतील, नागाचे फण्यावरील मणीही काढून घेतां येईल, हातानें पर्वतही झेलतां येईल, पायानें समुद्राचेंही उल्लंघन करितां येईल, निजलेल्या सिंहास जागेंही करितां येईल, आणि तीक्ष्ण अशा तरवारीच्या धारेवरही बसतां येईल, कदाचित् सर्व असंभवी गोष्टी घडतील पण शठापासून धनलाभ कधींही व्हावयाचा नाहीं. ४३५

अद्यापि दुर्निवारं स्तुतिकन्या वहति कौमारम्
सद्भ्यो न रोचते सा ऽ संतो ऽप्यस्यै न रोचंते ४३६

अर्थ- स्तुति हीच कोणी एक मुलगी आहे, परंतु ती अद्यापि कुमारीच आहे. कारण तिचें लग्न कोठेंच जमून येत नाहीं. म्हणजे तिला जे आवडतात असे जे स्तुत्य आणि योग्य पुरुष त्यांस ती (स्तुति) पसंत वाटत नाहीं. बरें ज्यांस ती आवडते, असले बेवकूब तिला आवडत नाहींत. याचें तात्पर्य फारच महत्वाचें आहे. तें असें कीं, खरोखरच जे थोर लोक आहेत त्यांची जर कोणीं स्तुति केली तर ती त्यांस आवडत नाहीं. परंतु ज्या मूर्खास आपली स्तुति व्हावी असें आवडतें त्याची स्तुति कोणीं करीत नाहींत. ॥ ४३६॥

अंधं दरिद्रिणमपि प्रियया विहीनम्
वीक्ष्येश्वरो वदति याच वरं त्वमेकम्॥
नेत्रे न नापि वसु नो वनिता स वव्रे
छत्राभिराम सुतदर्शनमित्यवाचे ४३७

अर्थ- कोणे एका अंध दरिद्री आणि स्त्रीरहित अशा पुरुषास पाहून शंकर त्यास प्रसन्न झाले आणि म्हणाले तूं एक वर माग. त्या वेळेस डोळे द्रव्य आणि धर्मपत्नी इतकीं मला आपल्या वरें करून असावींत, असें कांहींच त्यानें

मागितलें नाहीं. पण ज्याच्यावर छत्र धरिलें असल्या मुळें फारच सुंदर दिसत आहे अशा पुत्राचें दर्शन मला घडो इतकें मात्र बोलला! हें मोठें खुबीचें मागणें आहे. याला चातुर्य म्हणावें.४३७

स्वमस्तकसमारूढं मृत्युं पश्येज्जनो यदि
आहारोऽपि न रोचेत किमुतान्या विभूतयः ४३८

अर्थ- मृत्यु अगदीं डोक्यावर येऊन थडकला आहे. असें जर एकाद्या मनुष्यास समजून आलें तर त्यास अन्न देखील गोड लागत नाहीं. मग दुसरे ऐश्वर्यभोग विलास इ० कोठून गोड लागणार? तात्पर्य स्पष्टच आहे ३८

मूढ जहीहि धनागमतृष्णां कुरु तनुबुद्धे मनसि वितृष्णाम् ॥ यल्लभसे निजकर्मोपात्तं वित्तं तेन विनोदय चित्तम् ४३९.

अर्थ- जगद्गुरु शंकराचार्य जीवास बोध करतात— अरे मूढा, धनसंपादन करण्या विषयींची इच्छा सोडून दे. हे अल्पबुद्धे मनांत कोणत्याच विषया विषयीं स्पृहा करूं नकोस स्वकर्मवशें करून जेवढें वित्त मिळेल तेवढ्यानेंच चित्तांत संतुष्ट हो.

यावत्स्वस्थमिदं शरीरमरुजं यावज्जरा दूरतः
यावच्चेंद्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः॥
आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्
संदीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः ४४०

अर्थ- जों पर्यंत हें शरीर रोगरहित असून सर्व प्रकारें स्वस्थ आहे, जों पर्यंत वार्द्धक्य हें अगदीं दूर आहे, जों पर्यंत इंद्रियांतील शक्ति अखंडित आहे, आणि जों पर्यंत आयुष्याचा क्षय झाला नाहीं तों पर्यंत आपले कल्याणा विषयीं शहाण्या पुरुषानें मोठा प्रयत्न करावा. खरेंच आहे. घरास आग लागली असतां ती विझविण्या करितां पाणी हवें म्हणून विहीर खणायास आरंभ करणें. हा उद्योग कसला, व यास काय म्हणावें? तात्पर्य स्पष्ट आहे. ४४०

आरोग्यं विद्वत्ता सज्जनमैत्री महाकुले जन्म
स्वाधीनता च पुंसां महदैश्वर्यं विनाप्यर्थम् ४४१.

अर्थ- पुरुषास द्रव्य जरी नसलें तरी आरोग्य, विद्या, सज्जनाशीं मैत्री,

थोर कुलांत जन्म आणि स्वातंत्र्य इतकीं असलीं ह्मणजे त्याचें हें मोठें ऐश्वर्यच झालें.॥४४२॥

अकृत्वा परसंतापं अगत्वा खलनम्रतां
अनुत्सृज्य सतांवर्त्म यत्स्वल्पमपि तद्बहु ४४३

अर्थः- दुसऱ्यास ताप होईलसें कृत्य न करतां, दुष्टापुढें नम्र होण्याचा प्रसंग न येतां, आणि सन्मार्गाचें उल्लंघन न होतां, जें कांहीं थोडेसें मिळेल तेंच पुष्कळाचे जागीं आहे. वाहवा! याचेंच नांव संतोष!! ४४३.

संतोषामृततृप्तानां यत्सुखं शांतचेतसाम् ॥
कुतस्तद्धनलुब्धानां इतश्चेतश्च धावताम् ४४४

अर्थ- संतोषरूप अमृतानें तृप्त झालेले आणि ज्यांचें चित्त शांत झालें आहे अशा पुरुषांस जें सुख तें धनलुब्ध होऊन त्या करितां इकडे तिकडे घिरट्या घालणारे अशा पुरुषांस कोठून लाधणार? खरेंच, संतोषा सारखें सुख नाहीं.

दरिद्रस्य परा मूर्तिः तृष्णा न द्रविणोल्पता ॥
जरद्गवधनः शंभुः तथापि परमेश्वरः ॥४४५॥

अर्थः- द्रव्याचा कमीपणा असणें हें कांहीं दरिद्री पुरुषाचें खरें लक्षण नव्हे. तर ज्यास तृष्णा आहे तेंच त्याचें लक्षण समजावें. पहा या शंकराचें धन पाहूं गेलें तर काय तो सारा एक म्हातारा बैल आहे. असें असून त्यास परमेश्वर असें ह्मणतात. तात्पर्य धन असलें ह्मणजे श्रीमान् होतो आणि तेंच नसलें ह्मणजे दरिद्री होतो असा मुळींच अर्थ नाहीं. तर जो निस्पृह किंवा वितृष्ण तोच श्रीमान्. ४४५॥

येन मे गर्भगतस्यापि वृत्तिः कल्पितवान् विभुः
शेषवृत्तिविधानाय स किं सुप्तोऽथवा मृतः ४४६

अर्थः- मी गर्भांत असतां ज्या व्यापक परमेश्वरानें माझें पोषण केलें तो जगत्पालक अवशिष्ट आयुष्यपर्यंत माझी उपजीविका करावयास काय निजला आहे? अथवा मेला आहे! तात्पर्य स्पष्टच आहे. ॥४४६॥

अप्रार्थितानि दुःखानि यथैवाऽऽयांति देहिनां
सुखान्यपि तथाऽऽयांति दैन्यमत्रातिरिच्यते ४४७

अर्थः- मला दुःख असावें अशी कधींही कोणी इच्छा करीत नाहीं. म्हणजे-

तीं दुःखें प्राणिमात्रांस अप्रार्थित असून ज्या प्रमाणें प्राप्त होतात त्याच प्रमाणें सुखेंही प्राप्त होतात. परंतु या जीवांस धैर्य नसल्यामुळें व्यर्थ दैन्य मात्र करतो, एवढें मात्र अधिक आहे. ४४७.

हे दारिद्र्य नमस्तेऽस्तु धन्योऽहं त्वत्प्रसादतः ॥
लोकान्पश्योम्यहं सर्वान् न मां पश्यति कश्चन ४४८॥

अर्थ- कोणी एक दरिद्री पुरुष सहजगत्या दारिद्र्यास उद्देशून म्हणतो हे दारिद्र्या! तुला माझा नमस्कार असो. कारण तुझ्या प्रसादानें मी धन्य (सिद्ध) झालों आहें. कसा म्हणशील तर त्या योगानें मी सर्वांस पाहतों. परंतु मला कोणी देखील पहात नाहीं!! तात्पर्य- दरिद्री पुरुष आपल्यास कोणी कांहीं देईल काय म्हणून सर्वांकडे पहात असतो. पण त्यासकोणी ढुंकून देखील पुसत नाहीं. ४४८.

भ्रांत धाति रशेष याचकजने वैरायसे सर्वथा
यस्माद्विक्रम शालिवाहनमही भृन्मुंज भोजादयः॥ अत्यंतं चिरजीविनो न विहितास्ते विश्व
जीवातवः मार्कंडि ध्रुव लोमशो प्रभृतयः स्वेष्टाः
प्रभूतायुषः ४४९

अर्थ- एक याचक ब्रम्हदेवास म्हणतो. अरे बाबा ब्रम्हदेवा, आम्हां सर्व याचक जनांशीं खरोखर तुझा मोठा द्वेष आहे सें वाटतें. कां म्हणशील तर विक्रम शालिवाहन मुंज भोज इत्यादि जगाचें पोषण करणारे मोठमोठाले राजे यांस चिरंजीव करायाचें सोडून ज्यापासून फारसा उपयोग नाहीं अशा मार्कंडेय ध्रुव लोमश प्रभृति मंडळीस मात्र विपुल आयुष्यसंपन्न केलें आहेस. ४४९. तात्पर्य स्पष्टच आहे.

निःस्वोऽप्येकशतं शती दशशतं सोऽपीहे लक्षं शतंम्
लक्षेशः क्षितिराजतां क्षितिपतिश्चक्रेशतां वांछति
चक्रेशः सुरराजतां सुरपति ब्रह्मास्पदं वांछति
ब्रह्मा विष्णुपदं हरिः शिवपदं तृष्णावधिं को गतः ४५०

अर्थ- ज्या पाशीं कांहींच नाहीं तो शंभरांची इच्छा करतो, ज्या जवळ शंभर आहेत तो हजारांची इच्छा करितो. ज्या जवळ हजार आहेत तो एक ल-

क्षाची इच्छा करतो. लक्षाधीश झालेला भूपति होऊं इच्छितो. भूपति झाले-ला सार्वभौमपदाची इच्छा करतो. सार्वभौम राजा, इंद्र होऊं पाहतो, इंद्र ब्रम्ह-देव होऊं इच्छितो. ब्रह्मदेव विष्णु होण्याची इच्छा बाळगतो. आणि विष्णु शिव होण्याची इच्छा करतो.! सारांश– किती जरी मिळाले तरी अधिकाची-आशा आहेच. तेव्हां या आशेच्या पार कोण गेला असेल तो असो. ॥४५०॥

क्षुत्तृडाशाः कुटुंबिन्यो मयि जीवति नान्यगाः
तासामाशा महासाध्वी कदाचिन्मां न मुंचति ४५१

अर्थ– कोणी एक पुरुष मौजेनें लोकांस सांगतो. मी मोठा कुटुंबवत्सल आ-हें. कारण मला जगेन तों पर्यंत तीन कुटुंबिनी (बायका) आहेत कोणत्या ह्मणाल तर क्षुधा तृषा आणि आशा! या दुसरीकडे कोठें जात नाहींत. तेव्हां त्या पतिव्रताच आहेत! परंतु त्यांतही आशा नांवाची जी कुटुंबिनी आहे ती तर महासाध्वी आहे. कारण ती मला क्षणभर देखील विसंबत नाहीं.!! तात्पर्य,– क्षुधा आणि तृषा त्या अन्न आणि उदक यांच्या सेवना-नें कांहीं वेळ तरी नाहींशा होतात. पण आशा एक क्षणभरही नाहीशी हो-त नाहीं. ४५१.

यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किम्॥
लोचनाभ्यां विहीनस्य दर्पणः किं करिष्यति॥ ४५२॥

अर्थ– ज्याला मुळींच बुद्धि नाहीं त्याला शास्त्राध्ययनानें काय होणार? खरेंच आहे. ज्यास जन्मतःच डोळे नाहींत त्याच्या पुढें आरसा दाखविला तरी काय होणार आहे?

उदये सविता रक्तो रक्तश्चास्तमने तथा॥
संपत्तौ च विपत्तौ च महतामेकरूपता ४५३

अर्थ– उदयकालीं ज्या प्रमाणें सूर्य रक्तवर्णाचा असतो त्याच प्रमाणें अ-स्तमानकालींही तो रक्तवर्णाचा असतो. तेव्हां उदय ह्मणजे संपत्ति प्राप्त हो-तां आणि अस्तमन ह्मणजे विपत्ति प्राप्त होतां महाजनांच्या स्वभावाची एकरूपता असते. यांत तात्पर्य उघडच आहे कीं, संपत्ति प्राप्त झाली म्हणजे मोठा रंगेल स्वभाव असणें आणि विपत्ति प्राप्त झाली असतां मुख म्लान दिसणें इत्यादि विकार थोर पुरुषाच्या ठिकाणीं कधीं उत्पन्न होत नाहींत.

चा सर्वदा साररवाच स्वभाव असतो. ४५३

दानोपभोगरहिता दिवसा यांति यस्य वै
स लोहकारभस्त्रेव श्वसन्नपि न जीवति ४५४.

अर्थ- असलेल्या वित्तानें दान आणि उपभोग न करतां ज्या पुरुषांचे दिवस जातात ते पुरुष लोहाराच्या भात्या प्रमाणें श्वासोच्छ्वास करीत असून निर्जीव असे समजावेत. तात्पर्य उघडच आहे. ४५४॥

बहूनामल्पसाराणां संहतिः कार्यसाधिका
तृणैर्गुणत्वमापन्नैर्बध्यंते मत्तदंतिनः॥४५५॥

अर्थ- एकादें मोठें कार्य साधण्यास जे लोक (किंवा कांहीं तरी सामुग्री) पाहिजेत ते थोड्याही शक्तीचे कां असत ना, पण तेच पुष्कळ असले म्हणजे झालें. हें गवतच पहा किती क्षुल्लक आहे. पण तेंच पुष्कळ घेऊन त्याचे दोर केले असतां त्यांनीं मोठ मोठे मदोन्मत्त हत्ती देखील बांधतां येतात. तात्पर्य स्प-आ·

यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकता॥
एकैकमप्यनर्थाय किमु तत्र चतुष्टयम् ४५६

अर्थ- तारुण्य, धनसंपत्ति, अधिकार आणि विचारशून्यता या चारां पैकीं कोणताही एक कोणाजवळ असेल तर तेवढ्यानें मोठा अनर्थ होतो. मग जेथें हे चारी आहेत तेथें अनर्थ किती होतील म्हणून काय पुसावें? तात्पर्य स्पष्टच आहे. ४५६॥

छायामन्यस्य कुर्वंति तिष्ठंति स्वयमातपे
फलान्यपि परार्थाय वृक्षाः सत्पुरुषा इव ४५७

अर्थ- जे स्वतः उन्हांत असून दुसऱ्यास छाया देतात आणि ज्यांचीं फळेंही दुसऱ्याच्याच उपयोगा साठीं असे वृक्ष सत्पुरुषा प्रमाणेंच समजावेत. तात्पर्य स्पष्टच आहे.

एकोहि दोषो गुणसन्निपाते निमज्जतींदोः किरणेष्विवांकः॥ नतेन दृष्टं कविना समस्तं दारिद्र्यमेकं गुणकोटि हारि॥४५८॥

अर्थ- चंद्राच्या अनेक किरणांच्या तेजा मध्यें त्याचा कलंक असा दिसून येत नाहीं त्या प्रमाणें अनेक गुणसमुदायांत एकादा दोषही झांकला जातो.

असें ज्या कवीनें ह्मटलें आहे त्या कवीनें सर्वच कांहीं पाहिलें आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण एक दारिद्र्यदोष असला म्हणजे सर्व गुणांचा लोप होतो. ही गोष्ट त्या कवीच्या लक्षांत आली नाहीं. ४५८॥ तात्पर्य स्पष्टच आहे.

कुदेशमासाद्य कुतोऽर्थसंचयः कुपुत्रमासाद्य कुतोजं-
लांजलिः॥ कुगेहिनीं प्राप्य गृहे कुतः सुखं कुशिष्यम-
ध्यापयतः कुतो यशः॥ ४५९॥

**अर्थ:-** कुदेशामध्यें राहिलें असतां धनसंचय कोठून होणार? कुपुत्र झाल्यानें पित्यास जलांजलि कोठून मिळणार? एकादी दुष्ट पत्नी मिळाल्यास घरीं पुरुषास सुख कोठून मिळणार? आणि कुशिष्यास विद्यादान केल्यानें यश तरी कोठून मिळणार? यांतील तात्पर्य स्पष्टच आहे. ४५९.

माता यस्य धराधरेंद्रदुहिता तातो महेशस्तथा
भ्राता विघ्नकुलांतकः पितृसखो देवो धनानांपतिः
ख्यातः क्रौंचविदारणे सुरपतेः सेनाग्रगः षण्मुखः
तद्दुर्दैवबलेन कुत्र घटते नाद्यापि पाणिग्रहः ४६०

**अर्थ:-** ज्याची माता पर्वतराजपुत्री (पार्वती) त्याच प्रमाणें ज्याचा पिता महादेव, ज्याचा बंधु विघ्नहर्ता गजानन, ज्याच्या पित्याचा मित्र साक्षात् कुबेर जो क्रौंचास मारून कीर्तिसंपन्न झाला आहे, आणि जो इंद्राच्या सेनेचा नायक अशा या षडाननास (कार्तिकस्वामी) कोणताही कमीपणा नसून एक दुर्दैव त्याचे पाठीस हात धुवून लागल्यामुळें त्याच्या लग्नाचें अद्यापि कोठेंच जमत नाहीं. तात्पर्य दैव मोठें बलवत्तर आहे. ४६०॥

यन्मनोरथशतैरगोचरम् नस्पृशंति कवयोपि गिरायं-
त॥ स्वप्नवृत्तिरपि यत्र दुर्लभा लीलयैव विदधाति तद्वि-
धिः॥ ४६१॥

**अर्थ:-** ज्या विषयीं मनानें कल्पनाही करितां येत नाहीं. जी कवीलाही आपल्या वाणीनें सांगतां येत नाहीं व जी स्वप्नांतही कधीं गोचर व्हावयाची नाहीं अशी गोष्ट दैवाच्या योगानें मात्र सहज घडून येते. तेव्हां दैवाच्या योगानें काय होईल व काय होणार नाहीं, याचा कांहींच नियम नाहीं. ॥६१॥ ७॥ ॥

अनुचितमेवाचरितं पशुपतिमा यद्विधेः शिरश्छिन्नम्

छिन्नो नचास्य हस्तो येनायं दुर्लिपिं लिखति॥ ४६३॥

अर्थः- शंकरानें काळभैरव अवतार घेऊन ब्रह्मदेवाच्या पांचव्या मस्तकाचा जो छेद केला हें त्यानें अगदीं अयोग्य कृत्य केलें. कां ह्मणाल तर तो ब्रह्मदेव प्राण्यांस उत्पन्न करते वेळीं ज्या हस्तानें त्याच्या कपाळीं अमंगळ अक्षरें लिहितो तो त्याचा हात कांहीं त्यानें कापून टाकिला नाहीं. ॥४६४॥

अविज्ञात विशेषस्य सर्वतेजोपहारिणः॥
स्वामिनोनिर्विवेकस्य तमसश्च किमंतरम् ४६५

अर्थः- ज्यांत वस्तूचें विशेष ज्ञान म्हणजे तारतम्य योग्यता नाहीं व जो सर्वांच्या तेजांचा अपहार करणारा अशा अंधकारांत आणि विवेकशून्य अशा स्वामींत काय अंतर आहे तें सांग पाहूं॥४६४॥

मरणं प्रकृतिः शरीरिणां विकृति जीवित मुच्यते बुधैः॥
क्षणमप्यवतिष्ठते श्वसन् यदिजंतुर्ननु लाभवानसौ ४६५

अर्थः- प्राणिमात्रांस मरण ह्मणून जें कांहीं म्हणतात तें त्यांचा स्वभाव आहे. आणि जीवित म्हणजे जन्मास येणें हा विकार आहे. या साठीं जन्मास येऊन एक क्षणभर जरी वांचेल तरी तेवढ्यानें मोठा लाभ झाला असें मानावें. तात्पर्य- जन्म म्हणजे एक अलभ्य लाभ असें समजून जों पर्यंत तें जीवित आहे तों पर्यंत संतोष मानावा, परंतु मरणकालीं जीवितरूप अलभ्य लाभास हा प्राणी मुकतो ह्मणून त्याचा शोक करूं नये. कां ह्मणाल तर मरण हें स्वभावसिद्ध आहे. ४६५.

उड्डीना गुणपक्षिणः सुखफलान्यारोहकीर्णान्यधः॥
पर्यस्ताः परितो यशः स्तबकिताः संपल्लतापल्लवाः॥
प्रागेवापसृतः प्रमोदहरिणश्छाया कथांतं गता॥
दैन्यारण्य मतंगजेन सहसा भग्ने भिमानद्रुमे॥ ४६६॥

अर्थः- दैन्य हाच कोणी अरण्यांतील मदोन्मत्त झालेला गज त्यानें एका एकीं अभिमान वृक्षास उपटून मोडून टाकल्या बरोबर पहा काय काय चमत्कार झाले ते. प्रथमतःच सद्गुणरूप पक्षी उडून गेले. अनेक सुखें हींच कोणी एक त्याचीं फलें तीं हीं चोहींकडे खालीं गळून पडलीं. यशोरूपीगुच्छ आलेले संपत्तिरूप लतांचे पल्लव जिकडे तिकडे चार दिशांस फांकून

गेले, आनंदरूप हरिणानें तर केव्हांच अगोदर पळ काढला. आणि छाया (कांती) तर नामशेषच झाली. तात्पर्य, दारिद्र्यामुळें याचना करण्याचा प्रसंग आला ह्मणजे अभिमान सोडून द्यावा लागतो. अभिमान गेला म्हणजे सर्व गुण नसल्यासारखे होतात. मग सुखाचें तर नांवच घ्यावयास नको. अर्थात् आनंद नाहींसा होतो. व तेजोहीन होतो. ४६६

तीक्ष्ण धारेण खड्गेन वरं जिह्वा द्विधा कृता ॥
नतु मानं परित्यज्य देहि देहीति भाषितम् ४६७

अर्थ:- तीक्ष्ण धारेच्या तरवारीनें जिव्हेचे दोन तुकडे केलेले बरें. परंतु अभिमान सोडून दे दे, असें भाषण त्या जिव्हेनें करणें हें बरें नाहीं. तात्पर्य स्पष्टच आहे. ४६७.

क्षपां क्षामीकृत्य प्रसभमुपहृत्यांबु सरिताम्
प्रताप्योर्वीं कृत्स्नां तरुगहनमुच्छोष्य सकलम् ॥
क्व संप्रत्युष्णांशुर्गत इति तदन्वेषणपराः
तडिद्दीपालोकैर्दिशि दिशि चरंतीह जलदाः ॥४६८॥

अर्थ:- ज्यानें रात्रीस कृश (लहान) करून नद्यांचें उदक हरण केलें व ज्यानें सर्व पृथ्वीला ताप देऊन अरण्यांतील सर्व वृक्षांना शुष्क करून टाकिलें, तो सूर्य आतां कोठें गेला आहे, म्हणून त्यास शोधण्या करितांच काय हे मेघ या आकाशांत विद्युद्रूपी दीपाच्या प्रकाशानें प्रतिदिशेला हिंडत चालले आहेत! ४६८.

तारागणाश्चंद्रमसं भजंते न जातु नाथं नलिनीकराणाम् ॥ एतावतातस्य किमस्ति हानिर्ज्ञातं तयोरंतरमेषलोकः ॥४६९॥

अर्थ:- सर्व तारागण या चंद्राचीच उपासना करितात आणि कमलिनीनायक जो सूर्य याची कधींही जरी ते उपासना करीत नाहींत तथापि तेवढ्यानें त्या सूर्याचा काय बरें तोटा होणार आहे? कारण सूर्य आणि चंद्र या दोहों मध्यें काय अंतर आहे तें हे सर्व लोक जाणतातच ॥ ४६९

कृतोपकारं प्रियबंधुमर्कं मद्रांस्म हीनांशुमधः पतंतं
इतीव मत्वा नलिनीवधूभिर्निमीलितान्यंबुरुहेक्षणानि ४७०

अर्थ:- ज्यानें आपल्यावर उपकार केले, व जो आपला प्रिय असून हित करणारा असा हा सूर्य निस्तेज होत्साता अधःपातास (अस्तास) पावत आहे. त्यास आपण पाहिलें असें समजूनच काय त्याच्या त्या नलिनीरूप स्त्रियांनीं आपलीं कमलरूप नेत्रें झांकून घेतलीं आहेत. ४७०॥

चंद्रश्चंडकरायते मृदुगतिर्वातोऽपि वज्रायते
माल्यं सूचिकुलायते मलयजालेपः स्फुलिंगायते॥
रात्रिः कल्पशतायते विधिवशात्प्राणोऽपि भारायते
हा हंत प्रमदावियोगसमयः संहारकालायते॥४७१

अर्थ:- कोणा एका पुरुषास त्याच्या प्रियेचा विरह होऊन तो म्हणतो, हाय! अरेरे! हा चंद्र स्वतः शीतल असून मला सूर्याप्रमाणें प्रखर तापप्रद झाला आहे. मंदगतीनें वहात असणारा हा वायु तर वज्राप्रमाणें कठोर स्पर्श करीत आहे. कंठांत घातलेल्या त्या पुष्पांच्या माला सुया बोंचल्याप्रमाणेंमला वाटतात. ही रात्र पहा, कशी सहस्र कल्पांप्रमाणें जात आहे. दैववशें करून मला माझे प्राणांचेंही ओझेंच झालें आहे. आतां काय करूं! माझ्या प्रियेचा वियोग समय मला संहारकालाप्रमाणे दिसतो.

यस्मिन्नेवाधिकं चक्षुरारोपयति पार्थिवः॥
अकुलीनः कुलीनोवा स श्रियो भाजनं नरः॥४७२

अर्थ:- ज्याच्यावर राजाची अधिक नजर (कृपा) असते तो पुरुष मग कुलीन असो कीं हलकट असो, कसाही असेना, तो संपत्तीस पात्र होतो. ४७२

न सा सभा यत्र न संति वृद्धा वृद्धा न ते ये न वदंति धर्मं
धर्मः स नो यत्र न सत्यमस्ति सत्यं न तद्यच्छलमभ्युपैति ४७३

अर्थ:- जिच्या मध्यें ज्ञानवृद्ध असे विद्वान लोक नाहींत तिला सभा म्हणूं नये. जे धर्म म्हणजे सदाचरण किंवा कर्तव्याकर्तव्यविचार सांगत नाहींत त्यांस विद्वानही म्हणूं नये. ज्यांत सत्य नाहीं तो धर्म नव्हे. आणि ज्यांत कपट आहे त्यास सत्य असेंही म्हणूं नये. ४७३॥

रोगी चिरप्रवासी परान्नभोजी परावसथशायी
यज्जीवति तन्मरणं यन्मरणं सोऽस्य विश्रामः॥४७४

अर्थ:- ज्यास निरंतर रोग जडला आहे, जो फार दिवस प्रवासांत असतो, जो दुसऱ्यानें दिलेल्या अन्नावर उपजीविका करतो व जो दुसऱ्याचे घरीं राहतो अशा पुरुषाचें जगणें ह्मणून जें कांहीं ह्मणायाचें तें त्यांचें मरणच होय. परंतु खरोखरच त्याला मरण जेव्हां येईल तेंच काय ती त्याला विश्रांति! तात्पर्य स्पष्ट आहे. ४७४.

योऽत्ति यस्य यदा मांस मुभयोः पश्यतांतरम् ॥
एकस्य क्षणिका प्रीति रन्यैः प्राणै र्विमुच्यते ॥४७५॥

अर्थ:- जेव्हां कोणी दुसऱ्या एकाद्यास ठार मारून त्याचें मांस भक्षण करितो अशा त्या दोघां मध्यें काय भेद आहे तो पहा. एक क्षणभर संतोष पावतो आणि दुसरा आपल्या सर्व आयुष्यास मुकतो. तात्पर्य— आपल्या क्षणभर सुखासाठीं दुसऱ्याचा नाश करणें हें मोठें पाप आहे. ॥ ॥४७५॥

विनाप्यर्थैर्वीरः स्पृशति बहुमानोन्नतिपदम्
समायुक्तोऽप्यर्थैः परिभवपदं याति कृपणः
स्वभावादुद्भूतां गुणसमुदायावाप्ति विषयाम्
द्युतिं सैंहीं किंश्वा धृतकनकमालोऽपि लभते ४७६

अर्थ- एकादा वीर पुरुष धनहीन जरी असेल तरी तो बहुमान पुरःसर उच्च पदास चढतो. आणि कृपण पुरुष बहुधन संपन्न जरी असेल तथापि तो अपमानास्पदच होतो. खरेंच आहे. कुत्र्यानें आपल्या गळ्यांत सुवर्ण पदकाच्या माळा जरी घातल्या तरी, अंगीं अनेक गुण असल्यामुळें स्वाभाविक जी शोभा सिंहास असते ती त्यास येईल काय? तात्पर्य स्पष्टच आहे.

सिद्ध्यंति कर्मसु महत्स्वपि यन्नियोज्याः संभावना गुणमवेहि तमीश्वराणाम् ॥ किंवा भविष्यदरुणस्तमसां विभेत्ता तंचेत्सहस्रकिरणो धुरि नाकरिष्यत ॥ ४७७॥

अर्थ:- सेवकांना मोठमोठ्या कामीं जें यश येतें हा गुण त्यांचे अंगीं स्वामींनीं त्यांस दिलेला जो मोठा मान त्या मुळें असें समज. पहा बरें या सूर्यानें जर अरुणास रथाच्या अग्रभागीं योजिलें नसतें तर अंधकाराचा नाश करण्यास तो समर्थ झाला असता काय? तात्पर्य समर्थानीं हातीं धरलेला सेवक

महत्कार्यास समर्थ होतो. हें सामर्थ्य त्या स्वामीचेंच समजलें पाहिजे. ७७

यदि न स्यान्नरपतिः सम्यङ्नेता ततः प्रजा ॥
अकर्णधारा जलधौ विप्लवेतेह नौरिव ७८

अर्थ:- सुकाणूं धरणारा नसलेली नौका ज्या प्रमाणें हवीतिकडे वाहात जाऊन शेवटीं बुडूनही जाते त्या प्रमाणें राजा जर आपल्या प्रजेस उत्तम शिक्षण देणारा नसेल तर त्या प्रजाही जगांत स्वेच्छाचारी होऊन लय पावतील.

श्रोतॄन्मूकयति ब्रुवन्स्थिरतमं कुर्वन्नमीषां मनो निर्बाष्पः परबाष्पकृत्परदृशामेकाश्रयो नान्यदृक् ॥ यस्त्यक्तांग विकंपनः प्रचलयन्नित्यं सतां मस्तकं क्षीरं श्रोतृषु मुख्य मात्मनि गुणं धत्ते स वक्तोत्तमः ॥ ४७९ ॥

अर्थ:- जो भाषण करीत असतां श्रोतृजनांस मुक्या प्रमाणें गप्प बसवून-त्यांचे मनास अगदीं गुंग करून सोडतो. जो प्रासंगिक रसाविर्भावें करून आपल्या नाहीं पण श्रोत्यांच्या नेत्रांतून मात्र बाष्पपूर वहावयास लावितो. जो दुसरीकडे कोठें पहात नसून सर्व श्रोत्यांची दृष्टी आपलेकडे ओढून घेतो. व जो आपलें आंग मुळींच न हालवितां सभासदांस तर माना डोलवावयास लावतो. सारांश कर्णास अमृता सारखा गोड असा हा मुख्य वक्तृत्वगुण ज्याच्या जवळ आहे तोच वक्ता उत्तम असें समजावें. तात्पर्य स्पष्ट आहे. ७९

तव कर कमलस्थां स्फाटिकी मक्षमालाम् नख किरण विभिन्नां दाडिमी बीज बुद्ध्या॥ अनुलव मनु कर्षन् येन कीरो निषिद्धः स भवतु मम भूत्यै वाणि ते मंदहासः ॥ ४८०

अर्थ:- हे वाग्देवि! तुझ्या करकमलांत असणाऱ्या स्फाटिकाक्ष मालेच्या मण्यांवर नख किरणांची कांति मिश्रित झाल्या मुळें हे काय डाळिंबाचे दाणेच! अशा बुद्धीनें त्याजवर येऊन बसलेला शुक प्रतिक्षणीं आपल्या चोंचीनें खावें ह्मणून ओढूं लागल्यामुळें ज्यानें त्यास हुसकून लाविलें तें तुझें मंदहास्य मला समृद्धि देवो. ४८०.

स्त्रियोहि नाम खल्वेता निसर्गादेव पंडिताः ॥
पुरुषाणांतु पांडित्यं शास्त्रेणैवोप दिश्यते ४८१

**अर्थ:-** पहा काय चमत्कार आहे तो. या स्त्रिया खरोखर स्वभावतःच पंडित असतात. आणि पुरुषांना तर पांडित्य करण्यास शास्त्राभ्यासानें समजूं लागतें !

व्योमनि शंवो कुरुते चित्रं निर्माति यत्नतः सलिले ॥
स्नपयति पवनं सलिलैर्यस्तु खले चरति सत्कारम् ४८२

**अर्थ:-** जो कोणी कृतघ्न पुरुषाशीं सत्कारानें आणि पूज्य भावानें वागतो तो जणूं काय आकाशाचें कल्याण करतो. अथवा यत्नें करून उदकांत चित्रें काढतो. अथवा वायूला उदकानें स्नानच घालतो. असें म्हटलें तरी चालेल. तात्पर्य स्पष्टच आहे. ४८२.

गुणाश्रयं कीर्तियुतंच कांतं पतिं विधेयं सधनं रतिज्ञं ॥
विहाय शीघ्रं वनिता व्रजंति नरांतरं शीलगुणादि हीनं ८३

**अर्थ:-** सर्वगुणसंपन्न, कीर्तिमान्, सुंदर, आज्ञाधारक, सधन आणि रतिचतुर अशाही पतीला तत्काल स्त्रिया सोडून देतात. आणि सुशीलादि गुण शून्य अशा कोणत्याही अन्य पुरुषाकडे त्या गमन करतात.!! हर! हर! स्त्रियांचें अंतःकरण कसलें आहे कांहीं समजत नाहीं. ४८३.

जल्पंति सार्धमन्येन पश्यत्यन्यं सविभ्रमम् ॥
हृदये चिंतयत्यन्यं प्रियः कोनाम योषिताम् ४८४.

**अर्थ:-** या स्त्रिया एकाशीं हलकेंच बोलतात. विलासपूर्वक दुसऱ्याकडे पहात असतात आणि चित्तांत ध्यान तर तिसऱ्याचेंच करीत असतात. तेव्हां त्यांना खरोखर प्रिय कोण बरें असेल? तात्पर्य स्पष्टच आहे.॥४८४॥

कामनाम्ना किरातेन विततां मूढचेतसाम् ॥
नार्यो नरविहंगानां अंगबंधनवागुराः ॥ ४८५॥

**अर्थ:-** मदननांवाच्या भिल्लानें मूढबुद्धि झालेले अशा नररूपी पक्ष्यांच्या शरीरास बंधन करण्या करितां हे पाशच पसरून ठेविले आहेत. कोणते? स्त्रिया!४८५॥

पतिरतीव धनी सुभगो युवा परविलासवतीषु पराङ्मुखः॥ शिशुरलं कुरुते भवनं सदा तदपि सोसुदती

रुदती कुतः॥४८६॥

अर्थः- कोणे एके स्त्रीचा पति अत्यंत धनवान्, सुंदर, तरुण आणि इतर विलासी स्त्रियां विषयीं अगदीं पराङ्मुख असा असून त्याचें घर कसें मुलाबाळांनीं भरलेलें होतें, अशी सर्व प्रकारें अनुकूलता असून काय असेल कोण जाणे ती त्याची सुंदर स्त्री सदैव रडूं रडूं करीतसे. होपण कदाचित् असें तर नसेल कीं, तो तिचा पति सुभग ह्मणजे चांगलें नक्षत्र पाहून तिला संभोग देई. या मुळें तिला रतिसुख फारच थोडें मिळे. हें असती स्त्रीचें लक्षण समजावें.

विस्तारितं मकरकेतनधीवरेण स्त्रीसंज्ञितं बडिशमत्र भवांबुराशौ ॥ येनान्वितस्तदधरामिषलुब्धजीवं मत्स्यान्विकृष्य पचतीत्यनुरागवन्हौ ॥४८७॥

अर्थः- मदनरूपी कोळ्यानें या संसारसमुद्रांत स्त्री हेंच एक लहानसें जाळें पसरलें आहे. त्या योगानें तो त्या स्त्रियांच्या अधरसंबंधि अमृतरूपी आमिषास लुब्ध झालेले जीव हेच कोणी एक मासे यास बाहेर खेचून काढून अनुराग (प्रीति) हाच एक अग्नि आहे त्या मध्यें शिजवीत आहे. तात्पर्य. स्पष्टच आहे. ४८७॥

पिता यस्य शुचिर्भूतो माता यस्य पतिव्रता
उभाभ्यां यस्त्र संभूत स्तस्य नोच्चलते मनः॥४८८॥

अर्थः- ज्याचा पिता निष्पाप आणि माता ज्याची महापतिव्रता असते अशा उभयतां पासून जो उत्पन्न झाला त्या नराचें चित्त कोणत्याही निंद्य विषयाकडे धांवत नाहीं॥४८८.॥

मनोधावति सर्वत्र मदोन्मत्तगजेंद्रवत्॥
ज्ञानांकुशे समुत्पन्ने तस्य नोच्चलते मनः ४८९

अर्थः- हें मन पाहिजे त्या विषयाकडे मदोन्मत्त झालेल्या गजा सारखें धांव घेतें. परंतु यथार्थ ज्ञानरूप अंकुश ज्यास गवसला तो त्या अंकुशानें मदोन्मत्त गजतुल्य अशा मनास आपल्या कब्यांत ठेऊन त्यास इकडे तिकडे फिरकूं देत नाहीं. तात्पर्य स्पष्टच आहे. ४८९॥

अस्थिनास्ति शिरो नास्ति बाहुरस्ति निरंगुलिः॥

नास्ति पादद्वयं गाढं अंगमालिंगति स्वयम् ४९०

अर्थः- शरीर पहावें तों त्यांत हाडें नाहींत, डोकें नाहीं, हात आहेत, पण त्यास बोटें नाहींत आणि दोन्ही पायही नाहींत. पण स्वतः दुसऱ्याच्या अंगास गाढ आलिंगन देतो. असा कोण? आंगरखा!! ४९०.

जामाता जठरं जाया जातवेदा जलाशयः
पूरिता नैव पूर्यंते जकाराः पंच दुर्भराः ४९१

अर्थः- जामाता (जांवई), जठर (पोट), जाया (बायको), जातवेदा (अग्नि), आणि जलाशय (सागर) हे किती जरी पूरित केले तथापि पूर्ण होत नाहींत. एकंदरींत हे पांच जकार दुर्भर (भरण्यास कठीण) आहेत ४९१.

बिलाद्बहिर्बिलस्यांतः स्थित मार्जार-सर्पयोः॥
मध्ये चाखुरिवो भाति पत्नीद्वय युतो नरः ४९२

अर्थः- बिळाच्या बाहेर यावें तों मांजर टपून बसलेंच आहे. आंत जावें तर नागोबा वाटच पहात आहे. अशा दोघांच्या कचाटींत सांपडलेल्या उंदरा प्रमाणें दोन बायकांच्या तावडींत सांपडलेल्या पुरुषाची अवस्था असते. तात्पर्य स्पष्टच आहे. ४९२.

सदो वक्रः सदाक्रूरः सदा पूजामपेक्षते॥
कन्याराशि स्थितो नित्यं जामाता दशमोग्रहः ४९३

अर्थः- नेहमीं क्रूर आणि वक्र, तसेंच किती जरी दिलें तरी कधींही ज्याची तृप्ति होत नाहीं असा हा जांवई दहावा ग्रहच आहे. या मध्यें आणि इतर नऊ ग्रह यां मध्यें भेद इतकाच आहे कीं, शनि मंगळ वगैरे इतर ग्रह कोणत्याही राशीला [illegible] चलन पावतात. परंतु हा जांवईरूप ग्रह एकदां कां कन्या राशीस आला कीं मग तो हालतच नाहीं. तात्पर्य स्पष्टच आहे. ४९३॥

नारी परमुखंद्रष्ट्री कविर व्यवहारवित्॥
अपथ्यसेवी रोगीन्च क्रियद्भिर्नोपहस्यते॥४९४॥

अर्थः- परपुरुषाच्या मुखाकडे अवलोकन करणारी स्त्री, व्यवहारमूर्ख

असा कवि आणि अपथ्यसेवन करणारा असा रोगी या तिघांस किती लोक हसत नाहींत? तात्पर्य स्पष्टच आहे. ४९५॥

उदरद्वयभरणभयादर्धांगीकृतदारः॥ येदिनेवं तस्यैकस्तः कथमद्यापि कुमारः ४९६

अर्थ- शंकर हा अकिंचन आहे. तेव्हां दोघांचे पोट भरावें लागेल या भीतीनेंच काय त्यानें पार्वतीला आपल्या अर्धांगीं ठेविली? हो बहुधा हेंच कारण खरें; नाहीं तर त्याचा एक मुलगा अद्यापि कुमार म्हणजे लग्न न झालेला असा कां राहिला असता!

परान्नं प्राप्य दुर्बुद्धे मा प्राणेषु दयां कुरु॥
परान्नं दुर्लभं लोके प्राणा जन्मनि जन्मनि॥ ४९७

अर्थ- कोणी एक खादाड भिक्षुक ब्राम्हण आपल्या चिरंजीवास सांगतो. ए वेड्या, दुसऱ्याचे येथें भोजनास गेलें असतां सडकून अन्न झोडीत जा. त्या वेळेस आपल्या प्राणांकडे मुळींच पाहूं नकोस! कारण या जगांत न मिळण्या जोगें कायतें एक परान्न आहे. प्राण काय प्रत्येक जन्मांत लागलेच आहेत.

दिनमेकं शशी पूर्णः क्षीणस्तु बहुवासरान्॥
सुखादुःखं सुराणामप्यधिकं का कथा नृणां ४९८

अर्थ- चंद्र हा एकच दिवस कायतो पूर्ण असतो. परंतु पुष्कळ दिवस क्षीण असतो. तेव्हां देवाना देखील सुखा पेक्षां दुःख जर अधिक आहे तर मानवाची कथा किती? तात्पर्य स्पष्टच आहे.

गतः कामकथोन्मादो गलितो यौवनज्वरः॥
गतो मोहश्च्युता तृष्णा कृतं पुण्याश्रमे मनः ४९९

अर्थ- विषयसंबंधि गोष्टीनीं मला झालेला उन्मादवायु आतां नाहींसा झाला. तारुण्यरूपी आलेला ज्वर हाही गेला. आणि मी आतां शुद्धीवर आलों व माझी तृष्णाही गेली म्हणून हें माझें मन ज्यांत पुण्य आणि खरें सुख असा संन्यास घेण्या विषयीं गुंतलें आहे. यांत शांतरस आहे.॥ ॥ ॥ ॥

संध्यावंदन भद्रमस्तु भवते भो स्नान तुभ्यं नमः
भो देवाः पितरश्च तर्पणविधौ नाहं क्षमः क्षम्यताम्॥
यत्र क्वापि निषद्य यादवकुलोत्तंसस्य कंसद्विषः
स्मारं स्मारमघं हरामि तदलं मन्ये किमन्येन मे ॥५००॥

अर्थ- कोणी एक संसारास कंटाळलेला पुरुष सर्व कर्मांचा त्याग करून संन्यास घ्यावा असें मनांत आणून ह्मणतो. हे संध्यावंदना! तुझें कल्याण असो. आतां तूं जा. हे स्नाना, तुला माझा नमस्कार आहे. तूंही मला सोडून जा. अहो देवांनो, अहो पितरांनो, तुमच्या उद्देशानें यजन तर्पणादिक कर्मे करायास मी समर्थ नाहीं, तेव्हां मला क्षमा करा. कां ह्मणाल तर मी आतां कोठें तरी स्वस्थ बसून ज्यानें शत्रुरूपी कंसासही उत्तम गति दिली त्या यादवकुल शिरोमणि अशा श्रीकृष्णाचें वारंवार स्मरण करून आपलीं सर्व पातकें लयास पाठवीन. व एवढ्यानें माझें सर्व कार्य होऊन मला संतोष जर होत आहे तर दुसऱ्याशीं मला काय कर्तव्य आहे? ह्यांतही शांतरस आहे.
॥५००॥

## सुभाषितसंग्रहभाग २ समाप्त.

